# मनिमाटरस्.

( संपत्तिविवेचन )

---

याचें

इंग्रेजी वरून मराठी भाषांतर

नारो बाळकृष्ण पटवर्धन

यांणीं

केलें.




तें

दक्षिणी भाषेंत पुस्तकें प्रसिद्ध कर-
णाऱ्या मंडळीच्या आज्ञेवरून

ज्ञानदर्पण छापखान्यांत छापिलें.

मुकाम मुंबई.

सन १८५२

# अनुक्रमणिका.

# प्रस्तावना.

इंग्रेजी भाषेमध्यें "मनीमाटर्स" ह्मणजे "संपत्तिविवेचन" ह्मणून एक लाहान ग्रंथ आहे त्याचें हें पुढील भाषांतर केलें आहे. मूळ इंग्रेजी ग्रंथांत प्रतिपादित जो विषय त्याची भाषा पाहिली असतां केवळ आठ वर्षांच्या मुलासहि समजायाजोगी आहे; परंतु मराठी भाषा अगदीं कोंती आणि तिजमध्यें शास्त्रीय व व्यावहारिक विषयावर ग्रंथहि फार थोडे यामुळें इंग्रेजींतून मराठींत भाषांतर करणारांस अडचण पडत्ये, तेव्हां हाहि ग्रंथ मूळग्रंथाप्रमाणें उतरला नसेल हें काय सांगायाचें आहे! तथापि मी यथाशक्ति श्रम करून या ग्रंथांतील विषय करवला तितका सुबोध केला आहे.

आपणाजवळ संपत्ति असावी असें सर्वांस मनापासून वाटत असतें, व ती मिळविण्यासाठीं जो तो आपआपल्यापरी खटपट करीत असतो, आणि ती नाहींशी झाली असतां अत्यंत क्लेश पावतो; परंतु तिचें लक्षण काय, मनुष्याच्या केवळ निर्वाहार्थ आणि सुखार्थ ती किती आवश्यक आहे, ती कशी प्राप्त होत्ये, आणि तिचा व्यय कसा होतो, या

गोष्टीचें मर्मज्ञान थोड्यांसच असतें. अशा अत्युपयुक्त विषयांचें निरूपण जें शास्त्र करितें, त्याला व्यवहारशास्त्र ह्मणतात. आणि हें शास्त्र जसें अवश्य उपयोगी आहे, तसेंच गहनहि आहे. यास्तव हा संपत्तिविवेचनग्रंथ पाहिला असतां त्या शास्त्रांतील मुख्य विषय जो संपत्ति त्याची व्युत्पत्ति होऊन त्यापासून त्या शास्त्राचा अभ्यास करण्यास बरीच मदत होईल.

युरोपखंडामध्यें साधारण सर्व लोकांस व्यवहारशास्त्राची थोडी बहुत माहिती असती; यास्तव पुढील ग्रंथासारिखा ग्रंथ त्या देशांतील मुलांसच शिकविण्यास योग्य होय. परंतु या देशांत तसा प्रकार नाहीं. या लाहानशा ग्रंथांत जे विषय सांगीतले आहेत, त्यांतूनहि बहुतेक एथील लोकांस अगदीं नवीन आहेत, व कित्येकांविषयीं तर त्यांच्या विलक्षण समजुती आहेत, ह्मणून त्यापासून आजपावेतों त्यांचा बहुत अस्वार्थ झाला आहे. तेव्हां अर्थात यांची सर्वांस चांगली माहितगारी असणें फार आवश्यक आहे. तर याच हेतूनें केलेला जो हा लाहानसा ग्रंथ त्याचा, साद्यंत न वाचतां, सकृद्दर्शनीं

च अनादर करूं नये, मुळापासून त्याचें चांगलें अध्ययन करावें, आणि शिकविणारांनीं मात्र एवढी काळजी मनांत वागवावी, कीं कोणत्या एकाद्या गोष्टीविषयीं विद्यार्थ्यांची भलत्याच प्रकारें समजूत होऊं नये. कारण कीं, एकदां तसें झालें असतां मोठेपणीं तीं मतें फिरत नाहींत, उलटीं दृढ होऊन वाईट परिणाम होतात.

चांगल्या रीतीनें शिकविणें ह्मटलें ह्मणजे तें शिकण्यापेक्षां फार कठीण आहे. कित्येक विषय पुष्कळांस येत असतात; परंतु ते त्यांच्यानें दुसऱ्याचें समाधान होई अशा रीतीनें स्पष्ट समजवून देववत नाहींत. शिकावयास जसा कांहीं काळ लागतो, त्या प्रमाणेंच शिकवितां यावयास हि लागतो. पाहिलें असतां पुष्कळ लोक शिकवित असतात; परंतु शिक्षकानें काय मुख्य ध्यानांत ठेवावें, व त्याणें कोणत्या गोष्टीविषयीं मुख्य जपावें, हें थोड्यांसच माहित असतें. ह्मणून ह्या खालीं लिहिलेला मजकूर, अनुभवशीर आणि हुशार अशा एका पंतोजीच्या पत्रांतून उतरून घेतला आहे, त्याजकडे लक्ष द्यावें. ह्मणजे त्याणें हे

खालीं लिहिलेले पाठ मुलांस कोणत्या रीतीनें शिकविले असते हें ध्यानांत येईल.

"मुलें जो पाठ वाचित असतील, त्यांतील विषय त्यांना नीट समजावून द्यावा इतकेंच आवश्यक आहे असें नाहीं; तर त्यांतील प्रत्येक शब्दावरून मागें जें काय शिकले असतील त्याची त्यांस आठवण होई अशा रीतीनें शिकविलें पाहिजे.

"एक विषय टाकून दुसऱ्या विषयावर मागें नेणें या कृत्यासारिखें मुलांचा हिरमोड करणारें दुसरें कांहीं नाहीं; आणि असें करण्याची आवश्यकता आहे असें मला वाटत नाहीं. मनांत आण कीं, व्यापाराचा पाठ झाल्यावर मध्यें एक आठवडा अथवा पंधरवडा गेला आहे, आणि त्या विषयाचें त्यांनां पुनः स्मरण करावें असें माझ्या मनांत आहे; तर वर्गाला मागचा पाठ पुनः वाचायास सांगण्याची मला गरज लागत नाहीं; गलबत, चाहा, पाणी अथवा तसाच दुसरा कांहीं शब्द मला आढळला असतां त्याजवरून त्या विषयाचें त्यांस स्मरण करितों.

"एकादा शाहाणा शिक्षक अशा पद्धतीनें हा पाठ शिकवील, कीं तो पांच वर्षांपासून सोळा वर्षां-

थ्वी नारिंगासारखा वाटोळा आहे, आणि सोळा व-
र्षांच्या मुलास विचारीन कीं, वनस्पतिशास्त्रामध्यें
नारिंग हें कोणत्या जातीचें आहे?

"व्यापाराच्या पाठांतील प्रश्न.

"मागल्या पाठांत आपण काय वाचलें त्याची तुह्मांला आठवण आहे काय?-फार चांगलें; अदलाबदलीविषयीं. आणि हा पाठ कशाविषयीं आहे?- खरें; परंतु व्यापार या शब्दाचा अर्थ तुह्माला माहित आहे कीं काय?- पहिल्या दोन ओळी पाहा,- होय, निरनिराळ्या लोकांमध्यें जी अदलाबदली होत्ये तिचें नांव व्यापार. मागल्या पाठांत सांगीतलें कीं, चांभारानें आपल्या करितां पागोटें अथवा खुरची करणें, अथवा सुतारानें आपल्या करितां जोडा करणें हें फार वाईट आहे याची तुह्माला आठवण असेलच.

"खारका होतांना तुह्मी पाहिल्या आहेत काय? नाहीं; त्या या देशांत होत नाहींत. तर मग त्या आपल्याला कशा प्राप्त होतात? खचित् जेथें हो-



तात तेथून त्या आपणाला मिळतात; परंतु त्या कोठें होतात? बरोबर, इराण कोठें आहे, तें मला नकाशावर दाखवा. इराण हे आपल्या पूर्वेस आहे किंवा पश्चिमेस आहे? वायव्येस, ध्यानांत ठेवा, विसरूं नका. आपल्या वायव्येस जे देश आहेत तेथें इतकी उष्णता होत नाहीं. प्रत्येकजण एकएका फळाचें नांव घ्या पाहूं; हां, पहिल्या मुला, आरंभ कर; -पुरें कर. इराणी लोक मोबदला घेतल्या शिवाय आपलीं फळें देतील असें तुह्माला वाटतें काय? नाहीं; त्यांना आपण वस्त्रें अथवा दुसरें कांहीं पाठवितों, आणि ते आपल्याला नारिंगें, खारका पाठवितात; याचेंच नांव व्यापार.

"या देशाशिवाय कापूस आणखी कोणत्या देशांत पिकतो? बरोबर. अमेरिका कोणी शोधून काढिली? बरोबर; त्याणें ती इ० सन १४९२त शोधून काढिली. तेव्हापासून आजपर्यंत किती वर्षें झालीं? शंभर वर्षांस काय ह्मणतात? शतक. ज्या प्राण्याला शंभर पाय असतात त्याला काय ह्मणतात? शतपद. ध्यानांत ठेव कीं, शत ह्मणजे शंभर.

होतात. चाहा हा झाडाचें काय आहे? पान. साकर हें काय आहे? भाड्यांतून वाफ कशी जाये ती तुह्मी पाहिली असाल; तें वाफरूपानें पाणी जातें, आतां उसाच्या रस, आंतील सर्व पाण्याची वाफ होऊन बाहेर जाई तों पर्यंत कढवितात, ह्मणजे त्याची साकर होती. चाहा कोणत्या देशांतून येतो? होय; चीन कोठें आहे तें नकाशावर दाखवा. तेथील लोकांस चिनई असें ह्मणतात. व्यापार हा किती उपयोगी आहे! आपल्यापासून इंग्लंड हें समुद्रामुळें निराळें झालें आहे ही मोठी वाईट गोष्ट आहे, नाहीं काय? एथून तेथपर्यंत जर रस्ता असता तर फार चांगलें झालें असतें नाहीं बरें? तुला वाटतें कीं, होय, बरें झालें असतें. बुकांत पाहा आणि ज्याणें हें पुस्तक लिहिलें त्याला याविषयीं कसें वाटलें होतें तें सांगा; होय तो ह्मणतो कीं, पाणी हें व्यापाराच्या उपयोगीं आहे; परंतु त्याला असें कां वाटलें? बैलावरून अथवा गाड्यावरून जितकें ओझें नेतां येईल, त्यापेक्षां गलबतांतून



पुष्कळ नेतां येतें. दुसऱ्या कोणाला अ णखी एकादें कारण माहित आहे काय? होय फार चांगलें आहे; बैलांप्रमाणें गलबतास खावयास कांहीं लागत नाहीं, अथवा विसावाहि घ्यावा लागत नाहीं. पाणी हें व्यापाराच्या फार उपयोगीं आहे असें ह्मणायास हीं फार चांगली कारणें आहेत. त्वां ह्मटलें स कीं, पाण्यापेक्षां रस्ते फार बरे, याविषयीं तुझीं काय कारणें आहेत तीं तूं सांगशील? विचार करून सांग; तुला बुडण्याचें भय वाटत असेल नाहीं बरें? बरें आहे, आतां तूं विचार करित आहेस असें मला वाटतें.

एथें चाहा, कांचेचीं भांडीं, लोखंडी सामान वगैरे होत नाहीं, ह्मणून तें आपणाकरितां चिनी आणि इंग्लिश लोकांनीं पाठवावें आणि त्याकरितां आपण त्यांला अफु, कापूस वगैरे जिन्नस पाठवावे, हें फार चांगलें आहे असें तुह्मांला वाटत नाहीं काय? मला वाटतें कीं, आपल्या देशांत राहणारे जे सुतार, चांभार, हे जसे आपल्या उपयोगी आहेत तसेच इतर सर्व देशांतील उद्योगी मनुष्य हेहि आपल्या उपयोगी आहेत.

मूर्खपणा आहे असें तुह्माला वाटत नाहीं काय? इतर देश आपल्या उपयोगी आहेत, आणि आपण इतर देशांस उपयोगी आहों; यावरून आपण एकमेकाशीं गोडीनें असावें आणि परस्परांस सहाय व्हावें असाच ईश्वराचा हेतु दिसत आहे नाहीं बरें?

हें एक एथें लाहानसें गलबत आहे; आतां पहिल्या मुलापासून आरंभ करून एक एक जण त्याविषयीं कांहीं मला सांगा; सुकाणु, शिडें इत्यादि. या पाठांत जें काय शिकलां त्यांतून एक एक जण थोड थोडें सांगा पाहूं. चाहा चिनांतून येतो; चीन देशांतील लोकांस चिनी असें ह्मणतात; कोलंबसानें अमेरिका शोधून काढिली; उष्ण देशामध्यें फळें चांगलीं होतात; हें इराण आहे; शत ह्मणजे शंभर; आरबस्थान आपल्या पश्चिमेस आहे; सुकाणु फिरविल्यानें गलबत फिरतें; इत्यादि.

---

# पाठ १

## पैसा.

पैसा हा किती उपयोगी पदार्थ आहे! जर हा नसता, तर आपणास पाहिजे ती वस्तु मिळण्यास पराकाष्ठेची अडचण पडती. एका चांभारास आपल्या कुटुंबाकरितां अन्न वस्त्र पाहिजे आहे, आणि मोबदला करायास त्याच्या जवळ जोड्यांशिवाय दुसरें कांहीं नाहीं, तर अशा प्रसंगीं, त्यास जितकें धान्य पाहिजे तितक्या धान्याच्या किमतीचे जोडे, दाणेवाल्यास देऊन त्यापासून त्याला धान्य घ्यावें लागेल; व त्याप्रमाणेंच कोष्ट्याकडे जाऊन वस्त्रांकरितांहि तसेंच करावें लागेल; परंतु जर त्या दाणेवाल्यास त्या समयीं जोडे नको असले आणि पागोटें पाहिजे असलें, तर त्या चांभारास प्रथमतः, ज्या जवळ पागोटें आहे व त्याबद्दल त्याला जोडे पाहिजे आहेत असा एकादा मनुष्य शोधून काढिला



पाहिजे; नंतर, त्याजबळून जोडयांबद्दल पागोटें घेऊन तें त्या दाणेवाल्यास आणून द्यावें लागेल; तेव्हां त्या चांभारास धान्य मिळेल.

इतकें हें सर्व करायास मोठी खटपट केली पाहिजे; परंतु ही सर्व खटपट पैशाच्या योगानें वांचत्ये. ज्या कोणापाशीं पैसा आहे, त्याला जें काय पाहिजे तें लागलेंच मिळतें. दाणेकरी पाहिजे तेव्हां पैसा घेऊन धान्य देण्यास राजी असतो; कांकीं, पैशाबद्दल जोडा अथवा पागोटें, अथवा सर्पण, अथवा जें दुसरें कांहीं पाहिजे, तें आपणास मिळेल अशी त्याची खातरी असत्ये. व्यवहारांत पैसा चालू होण्याच्या पूर्वी, मनुष्यास एका वस्तूबद्दल दुसरी वस्तु घेण्यास किती काळ व किती श्रम लागले असावे बरें?

ख्रिस्तीशास्त्रामध्यें द्रव्यलोभाविषयीं निषेध सांगीतला आहे. वास्तविक पाहातां, पैशावर अथवा दुसऱ्या कोणत्याहि ऐहिक पदार्थांवर सर्वस्वीं प्रीति ठेवणें हा मूर्खपणा होय, व त्यांत पापहि आहे. कित्येक पुरुषांचें सारें लक्ष्य खाण्यापिण्याकडे असतें, कित्येकांचें चांगल्या चांगल्या

पोषाकांकडे असतें; परंतु त्या सर्व वस्तु मनुष्याचें मन एकादे वेळेस ईश्वरापासून परावृत्त करितात. ह्मणून येशु ख्रिस्त सांगतो कीं, "आकाशामध्यें कसर व कलंक नाश करीत नाहींत तेथें तुह्मीं आपल्यासाठीं संपत्ति सांठवा." आणि "आह्मी काय खाऊं अथवा पिऊं अथवा काय पांघरूं असें ह्मणून चिंताक्रांत होऊं नका" परंतु "पहिल्यानें देवाचें राज्य आणि त्याचा प्रमाणिकपणा (यांचा) शोध करावा."

सर्वांचें दरिद्र दूर करितां येईल, पण लोभ्याचें मात्र दरिद्र कधीं दूर करवणार नाहीं; कांकीं, जो अल्पसंतोषी आहे, त्याची इच्छा तृप्त करितां येती; परंतु जो लोभी आहे, त्याची तृप्ति कशानेंहि होणार नाहीं. एकादा गरीब मनुष्यहि कदाचित् कधींतरी मातबर होईल; परंतु जो लोभी आहे, त्याला कितीहि मिळालें तरी तो भिकारीच; कारण कीं, जें त्याच्याजवळ असतें, तें तो खर्चायास भितो, उलटी त्याला अणखी अधिक मिळविण्याची आशा सुटते. असा मनुष्य आपल्यास इहलोकीं मात्र ठेवा करून ठेवितो, परलोकीं कामास येईल असें कांहीं करीत नाहीं, ही किती वाईट गोष्ट आहे! यास्तवच लोभाविषयीं फा-

र सावध राहावें असें शास्त्रांत सांगीतलें आहे.

असें आहे तथापि, ईश्वर आपणास ज्या ज्या चांगल्या वस्तु देतो, त्यांचा आपण मोठ्या काळजीनें योग्य उपयोग करून त्यांविषयीं त्याचे उपकार मानावे, हें आपणास उचित आहे. संपत्तीचा यथार्थ उपयोग झटला असतां, सज्जनांस विपत्तिकाळीं आश्रय देणें हाच आहे, व येणेंकरूनच सत्पुरुषांच्या अंतःकरणास समाधान प्राप्त होतें.

या कारणासाठीं पैसा हा फारच उपयोगी आहे, कांकीं, आपणाजवळ द्यावयास नाहीं अशा कांहीं वस्तूची एकाद्या गरीबास गरज लागेल, त्यासमयीं जर आपण त्याला पैसा दिला तर तो लागलेंच जें काय पाहिजे तें त्याबद्दल घेऊं शकेल; मग तें धान्य असो, वस्त्र असो, अथवा दुसरें कांहीं असो.

प्रेषितपौल यांच्या वेळीं जुडिआ प्रांतांत जेव्हां दुष्काळ पडला, तेव्हां "तेथील गरीब साधूंस (म्हणजे ख्रिस्ती लोकांस*)" सहाय करणें हें फार चांगलें आहे, असें ग्रीस एथील ख्रिस्ती लोकांस वाटलें.

* प्रेषितांचीं कृत्यें अ. ५.

परंतु इतकें दूर धान्य पाठवावयास फारच श्रम पड-ते; अणखी कदाचित् त्यांच्या जवळ द्यावयास धान्य-हि नसेल; ह्मणून त्यांणीं पैसा जमविला. आणि तो पॉल याणें जुडिआ एथें आणिला, नंतर त्या पैशाचें त्या ग-रीब लोकांनीं, जेथून धान्य मिळावयाजोगें होतें ते-थून खरेदी करून आणिलें.

## पाठ २
### अदलाबदली.

सहज कोणाच्या असें मनांत येईल कीं, प्र-त्येक मनुष्य जी काय वस्तु पाहिजे ती इतरांजवळू-न विकत घ्यावयास कां जातो; तो स्वतः कां करीत नाहीं?

तर त्याणें एका सुतार-चांभारास जाऊन विचा-रावें कीं, तुला पागोटें, धोतर, आंगरखा, खुर्ची, मेज, अथवा जें कांहीं लागतें, तें तूं स्वतः कां करीत नाहीं-स? ह्मणजे तो असें ह्मणेल कीं, एक खुर्ची करावया-ची झाली, तरी ती करायास हत्याराचा चांगला ब-राबर संच पाहिजे; व त्याच संचानें शेंकडो खुर्ची दे-

खील करितां येतील.) आणि हत्यारें बचुकाहि मी-च करीन ह्मटलें तर; अगोदर भट्टी तयार केली पाहिजे, व ऐरण, आणि हातोडा, हीं मिळविलीं पाहिजेत. बरें त्याणें इतकेंहि केलें तथापि ओबड धोबड असें एकादें हत्यार अथवा खुर्ची करायास त्याला पराकाष्ठेचे श्रम लागतील; कांकीं तशा जातीचें काम करायाची त्याला संवय नाहीं. त्याला दहा खुर्ची विकत घ्यायापुरते जोडे करायास जे श्रम लागतील त्यापेक्षां स्वतः एक खुर्ची करायास अधिक श्रम लागतील. तसेंच सुतारासहि जोडा करायास मोठा आयास पडेल; या प्रमाणेंच शिंपी, साळवी इत्यादिकांविषयीं जाणावें. यावरून उघड आहे कीं, जो धंदा ज्याला येत असेल तोच त्याणें करून परस्परांच्या गरजा चालवाव्या, यांतच सर्वांचें मोठें हीत आहे.

कित्येक रानटी लोक आहेत, त्यांमध्यें हा अदलाबदली करण्याचा प्रकार अगदींच चालत नाहीं. प्रत्येकजण आपआपल्याकरितां स्वतः झोंपडी बांधितो, वस्त्रे करितो; मासे मारण्याकरितां लहानशी होडी, जाळें, गळ, तसेंच पारध करण्या-

करितां भाला, तिरकमठा इत्यादि सर्व सामान आपण एकटाच करितो; क्वचित् थोडकीशी शेतकीहि करितो. अशा लोकांची अवस्था आपणामधील गरीब लोकांपेक्षांहि कठीण. वल्कलें अथवा कच्चीं कातडीं हीं त्यांचीं पांघरुणें असतात; त्यांच्या झोंपड्या आपल्या खोपट्यांपेक्षां चांगल्या नसतात; त्यांच्या होडक्यांपेक्षां पोखरलेले ओंडे अथवा कोंठिंबे हे बरे; त्यांचीं हत्यारें अगदीं ओबडधोबड असतात. जेथें प्रत्येक मनुष्य आपणाकरितां सर्व वस्तु जातीनें करितो तेथें त्या सर्वच वाईट असतात; आणि ज्या देशामध्यें सुधारलेले हजारो लोक चांगले सुखानें नांदतात, त्याच देशांत असल्या रानटी लोकांतून शंभरांच्यानें अर्धपोटी राहून निर्वाह करवणार नाहीं.

## पाठ ३.

### व्यापार.

निरनिराळ्या देशांतील लोकांमध्यें फार उपयोगी असा जो जिनसांची अदलाबदली करण्याचा प्रकार चालतो, त्याला व्यापार असें ह्मणतात. एका

देशामध्यें जे पदार्थ उत्पन्न होतात, ते सर्वच दुसऱ्या देशांत होत नाहींत; परंतु अदलाबदलीच्या योगानें त्या सर्व पदार्थांचा उपभोग सर्व देशांस प्राप्त होतो.

हवेच्या अतिशीतत्वामुळें इंग्लंड येथें कापूस अगदीं पिकत नाहीं, तो या देशांत पुष्कळ पिकतो. परंतु आह्मापेक्षां इंग्रेज लोकांमध्यें कलाकौशल्य आणि यंत्रें हीं फार चांगलीं आहेत, ह्मणून त्यांच्या सारखीं चांगलीं आणि सस्तीं अशीं वस्त्रें आपणांस करितां येत नाहींत. यासाठीं आपण त्यांजपासून वस्त्रें व दुसरें लोखंडी वगैरे सामान घेऊन त्यांस मोबदला कापूस देतों, तेणें करून उभय देशांस सुखप्राप्ति होते.

तसेंच चाहा, रेशमी कापड, चिनीभांडीं, वगैरे पदार्थ एथें होत नाहींत. खजूर, खारीक, बदाम, पिस्ते, मनुका, वगैरे मेवा, इराण, आरबस्तान वगैरे देशांतून एथें येतो. हे सर्व जिन्नस आपणांस अफू, नीळ व वस्त्रें यांबद्दल मिळतात; कांकीं, अफू, नीळ, वगैरे पदार्थ हे चीन, इराण आणि आरबस्तान, एथें होत नाहींत. याप्रमाणें, लोक हे सर्व जिन्नस अदलबदल करितात. ह्मणून सर्वांस हितावह पड-

तात; परंतु, जर ते असें न करितां सर्व जिन्नस आप-आपल्या देशांतच उत्पन्न करूं लागतील, तर फारच अहित होईल.

पाहा, पाणी हें व्यापाराच्या किती उपयोगी आहे! प्रथमतः असें वाटतें कीं, समुद्रामुळें देश हे निरनिराळे झाले आहेत; परंतु व्यापारदृष्या पाहूं लागलें, तर ते समुद्राच्या योगानें वेगळे होण्याच्या ठिकाणीं एकत्र झाले आहेत असें वाटतें. जर हिंदुस्थान आणि इंग्लंड यांच्या मध्यें पाणी नसतें, जमीनच असती, तर आपणांस विलायती माल हाल्लीं जसा सस्ता मिळतो तसा मिळता ना. कां कीं, जमिनीवरून जाण्याकरितां मोठा खर्च करून रस्ते बांधावे लागते; व एका तारवांतून जितकें ओझें येतें, तितकें गाड्यांतून अथवा बैलांवरून आणायास शेंकडो गाड्या, बैल देखील पुरले नसते; त्यामुळें तो माल पराकाष्ठेचा महाग पडता. या कार्याकरितां सृष्टिकर्त्यानें समुद्र हा उत्कृष्ट मार्ग करून ठेविला आहे, त्यांतून जाण्याला फक्त गलबतांस शिडें मात्र लाविलीं पाहिजेत म्हणजे वायु बैलांचें काम करायास सिद्धच आहे.

अणखी, गलबतास गाडीसारिखें जमीनीवरून ओढायास जितके श्रम लागते, तितके पाण्यांतून ओढायास लागत नाहींत; कारण कीं, तें पाण्यावर तरतें. याच कारणावरून जलमार्गीनें अल्पायासें माल आणण्याकरितां, कित्येक ठिकाणीं कालवे बांधिले आहेत. एक किंवा दोन बैल लाविल्यानें जें ओझें जमीनीवरून हालणार नाहीं, त्याच्या दुप्पट ओझें तितकेच बैल कालव्यांतून ओढीत नेतील.

यावरून, जे लोक गोडीनें व्यापार करून परस्परांस संपत्तिमान व सुखी करण्याचें सोडून एकमेकांचा हेवा करून लढतात, ते किती मूर्ख व पापी असावे. तस्मात्, मनुष्याच्या सुखार्थ, ईश्वरें कृपाळू होऊन, ज्या सोयी करून ठेविल्या आहेत, त्या असल्या दुर्जनांस काय होत.

---

## पाठ ४

### नाणें.

लोक सोन्यारुप्याचे अथवा तांब्याचे लहानसे तुकडे घेऊन त्यांच्या मोबदला आपला माल कां

देतात? असा जर एकाद्या मनुष्यास प्रश्न केला, तर तो आपणास सांगेल कीं, ते धातूचे मुद्रित तुकडे (ज्याना नाणें असें ह्मणतात, ते) आपणाजवळ असले ह्मणजे त्याबद्दल जें काय पाहिजे तें द्यावयास सर्व लोक राजी असतात, ह्मणून तसें करितों. ते दिले ह्मणजे खाणावळींत जेवायास मिळेल, कापडकरी ते घेऊन आपल्यास कापड देईल, चांभार जोडा देईल, तसेंच इतर सर्वही करितील. पुनः जर त्याला विचारलें कीं, खाणावळवाला, कापडकरी, चांभार व आणखी दुसरेहि असें कां करितात? तर तो पुनःहि तसेंच सांगेल कीं, त्यांना जे काय पाहिजे तें, त्या नाण्याबद्दल किंवा ज्याला पैसा असें ह्मणतात, त्याबद्दल मिळतें, ह्मणून तेहि तसें करितात.

परंतु नाण्याचा असा हा उपयोग करण्याची युक्ति पहिल्यानें कशी निघाली? नाण्याचा मोबदला करण्याशिवाय, दुसरा कांहीं उपयोग नसतां, सर्व लोक सोन्यारुप्याचे लहानसे तुकडे घेऊन अन्न वस्त्र वगैरे पदार्थ देण्यास कसे कबूल झाले? तसेंच गारगोट्या अथवा लांकडाचे तुकडे अथवा दुसरें कांहीं नाण्यासारिखें कां चालवीत नाहींत?

कित्येक लोकांस वाटत असेल कीं, नाण्यावर कायद्याप्रमाणें सरकारचा शिक्का उठविलेला असतो ह्मणून लोक त्याला मोल्यवान् समजून पैसा असें मानितात. परंतु असें नाहीं. कारण कीं, रुपया एवढा तांब्याचा तुकडा घेऊन त्याजवर शिक्का उठविला आणि त्याला रुपया असें ह्मटलें, तथापि तो घेऊन बाजारांत गेलें असतां, रुप्याच्या रुपयानें जो काय जिन्नस यावयाचा, तितका जिन्नस त्या तांब्याच्या रुपयानें येणार नाहीं. सरकारच्या कायद्यानें आपणास कदाचित् अशा तांब्याच्या तुकड्यास रुपया असें ह्मणावें लागेल; परंतु नुस्तें रुपया ह्मटल्यानें त्याचें मूल्य वाढणार नाहीं. एका आण्याच्या जिनसास तसले रुपये तीन अथवा चार द्यावे लागतील. ह्मणून नाण्याला शिक्क्यानें अथवा कायद्यानें मूल्य येत नाहीं.

कांहीं रुपये आटवून त्यांची लगड केली, तथापि बाजारांत तिची किंमत त्या रुपयांपेक्षां विशेष कमी होणार नाहीं; व सोन्याच्या नाण्याविषयींहि असेंच जाणावें. कांकीं, सोनें आणि रुपें यांचें नाणें असलें, अथवा भांडें असलें, किंवा कांहीं दागिना असला, तरी तीं मूल्यवान् आहेत. सोन्या रुप्यापेक्षां

तांबें जरी फार नीच आहे, तथापि त्यालाहि काहीं मूल्य आहे; मग त्याचा पैसा असो, अथवा भांडें असो अथवा पत्रा असो. सोनें, रुपें, आणि तांबें यांस मुळचेंजर कांहीं मूल्य नसतें, तर त्यांतून एकाचेंहि नाणें करावें असा विचार लोकांच्या मनांत आला नसता.

कित्येक देशांत नाण्याच्या ठिकाणीं दुसऱ्या कांहीं वस्तूंचा पैशाप्रमाणें उपयोग करतात. कित्येक जातीच्या काफ्री लोकांस लहान लहान सुंदर कवड्या फार आवडतात; ह्मणून त्यांच्या स्त्रिया त्यांच्या माळा करून अलंकारासारिख्या गळ्यांत घालितात. आणखी त्याच कवड्या त्या लोकांमध्यें पैशाप्रमाणें चालतात. तेथें सुमारें साठ कवड्या दिल्या ह्मणजे एका दिवसाची अन्नसामग्री मिळते. आणखी आफ्रिकेच्याच कित्येक भागांत, एकाच जातीच्या वस्त्राचे एकसारखे केलेले तुकडे, पैशाप्रमाणें चालतात; ह्मणजे ते वस्त्रांचे तुकडे सर्व जिनसांकरितां मोबदला घेतात; आणि ते ज्यांनां वापरायाचे असतात तेच लोक घेतात असें नाहीं; ज्यांचा उद्देश फक्त पुनः दुसऱ्या कांहीं वस्तूंकरितां मोबदला करायाचा असतो, असेहि लोक ते तुकडे

तात; त्यांचा भाव चढत उतरत असतो ह्मणून पाव आण्यास सुमारें त्या ६४ पासून १०० पर्यंत मिळतात. सुरतप्रांतीं कडुबदाम नाण्याप्रमाणें चालतात; तेपांव आण्यास सुमारें ३६ पासून ६४ पर्यंत येतात.

परंतु यांतून कोणतीहि वस्तु सोन्यारुप्याच्या नाण्याप्रमाणें सोईवार नाहीं; धातूचें नाणें असलें; ह्मणजे तें मोडत नाहीं, विशेष झिजत नाहीं, आणि त्याच्या मूल्याच्या प्रमाणानें त्याला ठेवायास जागाहि फार थोडी पुरते. परंतु ही गोष्ट विशेषें करून सोन्यारुप्याविषयीं मात्र लागू आहे. तांब्याचें नाणें किरकोळ देण्याघेण्यास विशेष उपयोगीं पडतें खरें, परंतु मोठ्या रकमांची देवघेव करण्यास हें अगदीं सोईवार नाहीं. एका ह्मशीच्या अथवा घोड्याच्या किमतीचें तांब्याचें नाणें द्यावयाचें ह्मटलें ह्मणजे एक मोठें ओझें होईल. परंतु वीस घोड्यांच्या किमतीच्या मोहरांचें एका मनुष्याचेंहि ओझें होईल न होईल.

याविषयीं नोट ही सर्वांपेक्षां फार सोईची आहे. लोक जरी हिला पैसा असें समजतात, तथापि वास्तविक पाहातां ही पैसा नाहीं, ही हुंडी चिठी

बद्दल सोनें रुपें, अथवा पाहिजे तें मिळतें, असा जर लोकांस भरंवसा नसला, तर ती घेऊन कोणी एक दमडीहि देणार नाहीं. परंतु जों पर्यंत लोकांस याविषयीं भरंवसा आहे, तों पर्यंत ते पैशा ऐवजीं नोटी घेतील; कांकीं, पाहिजे तेव्हां नोटी बद्दल पैसा मिळेल अशी त्यांची खात्री आहे.

---

## पाठ ५

### मूल्याविषयीं.

### प्रकरण १

पैशाच्या ठिकाणीं उपयोग करायास ह्मटल्या ह्मणजे सोनें आणि रुपें या धातु फारच सोईच्या आहेत; कारण कीं, त्यांच्या मूल्या प्रमाणें पाहिलें असतां त्या थोडकी जागा व्यापितात. आणि याच कारणावरून त्यांस उंच धातु असें ह्मणतात.

लोखंडा सारिखा सोनें आणि रुपें यांचा उपयोग नसतां लोखंडापेक्षां ती अधिक मूल्यवान् कां?

चाकु, कातर, कुऱ्हाड, नासणी, इत्यादिकावांचून आपलें कांहीं चालणार नाहीं, आणि हीं तर, लोखंडाचीं असीं चांगलीं होतील, तशीं दुसऱ्या कशाचींहि व्हावयाचीं नाहींत.

याचा अर्थ बराबर ध्यानांत येण्याकरितां आपणास अगोदर हें ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं, ज्या अतिशय उपयोगी वस्तु आहेत त्याच अतिशय मूल्यवान् आहेत असें नाहीं. हवा आणि पाणी यांसारिखें उपयोगी दुसरें कांहीं नाहीं; जर तीं नसलीं तर आपण वांचणार नाहीं; असें आहे तथापि, मूल्य या शब्दाच्या वास्तविक अर्थाप्रमाणें पाहिलें असतां बहुतेक ठिकाणीं त्यास अगदीं मूल्य नाहीं; ह्मणजे कोणीहि त्यांच्या मोबदला कांहीं वस्तु देणार नाहीं; कांकीं, त्याला तीं फुकट मिळतात.

कोठें कोठें पाण्याचा फार तोटा असतो; अशा ठिकाणीं, लोक मोठ्या खुषीनें पाणी विकत घेतात. ख्रिस्ती शास्त्र वाचलें असतां पाण्याच्या विहिरीविषयीं झालेल्या कज्यांच्या पुष्कळ गोष्टी आढळतील*; कारण कीं, एशिआ खंडांतील कित्येक

* जेनिसिस अ० २५ इत्यादि.

देशांत पाण्याचा इतका तोटा आहे कीं विहीर ही एक मोठी चीज असें मानितात.

मारवाडांत पाण्याचा फार तोटा आहे, त्यामुळें तेथें ज्याच्या घरीं पाण्यानें भरपूर अशी विहीर आहे तो मोठा सुखी असें समजतात. असें आहे तथापि ईश्वरी कृपेनें, जेथें पाण्याची समृद्धि आहे, तेथें पाण्याचा जितका उपयोग आहे, त्यापेक्षां जेथें पाणी विकत घ्यावें लागतें, तेथें अधिक आहे असें नाहीं. त्याला जें मूल्य येतें तें केवळ त्याच्या कमताईमुळें येतें. त्याचा तेथें उपयोग फार ह्मणून येतें असें नाहीं. जेथें लोखंडाची फार कमताई आहे तेथें तें मोठें मूल्यवान् आहे. इंग्रेज लोकांनी अशीं कित्येक बेटें पाहिलीं आहेत कीं, तेथें लोखंड अगदीं उत्पन्न होत नाहीं, त्यामुळें तेथील लोक एकादें डुकर देऊनहि थोडेसे खिळे घेण्यास राजी असतात.

परंतु बहुतेक देशीं ईश्वरी कृपेनें सर्व धातूंपेक्षां अधिक उपयोगी असें जें लोखंड, त्याची जरी समृद्धि आहे, तरीहि त्याला कांहीं मूल्य आहे; कां कीं हें खाणींतून खणून काढावें लागतें. आणि त्याची आउतें करण्याच्या पूर्वीं त्याला भट्टींत घालून

आटवावें लागतें.जर खिळे,चाकु,कातऱ्या इत्यादि पदार्थ स्वतःसिद्ध असते,आणि खड्यांसारिखे सर्वत्र सांपडते, तर त्यांना कांहीं एक मूल्य नसतें. कारण ते सर्वांस फुकट मिळते; परंतु असें झालें असतें,तरी ते आतां जसे उपयोगीं पडतात, तसे तेंव्हांहि उपयोगीं पडते.

ज्या वस्तूची कमताई आहे,त्या वस्तू आपणाजवळ बाळगण्यास जर कांहीं कारण नसतें तर कमताईनेंच केवळ त्या अधिक मूल्यवान् असत्या असें झालें नसतें. असे कित्येक जातीचे दगड आहेत कीं, ते विरळा मिळतात; परंतु त्यांना कांहीं मूल्य नाहीं; कांकीं, ते अगदीं उपयोगी नाहींत, आणि दिसण्यांतहि चांगले नाहींत. अशा जातीच्या दगडांस आपण मोबदला कांहीं देणार नाहीं. आतां ते अनायासें मिळतात ह्मणून देणार नाहीं असें नाहीं;परंतु आपणास त्याजविषयीं इच्छा नाहीं ह्मणून देणार नाहीं.

एकादा दगड दिसण्यांत फार चांगला असून जो क्वचित मिळतो, तो जरी अलंकाराशिवाय फारसा दुसऱ्या कशाच्या उपयोगी पडत नसला, तथा-

पि मोठा मूल्यवान् असतो. जसें हिरा, माणिक, पाच, इत्यादि. सर्व लोक अन्न वस्त्र विकत घेण्याकरितांच मात्र मोठी मेहनत करितात असें नाहीं; तर शोभेकरितां हिरे, कलाबतु, इत्यादि शोभिवंत पदार्थ विकत घेण्याकरितांहि पुष्कळ लोक मेहनत करितात.

आणखी, त्या वस्तु दिसण्यांत सुंदर असून जे धारण करितात त्यांच्या संपत्तीचीं चिन्हें होत; म्हणून लोक विशेषेंकरून त्या असाव्या असें इच्छितात. एकादा फुलांचा तुराहि हिरे माणकें यांपेक्षां अधिक सुंदर दिसतो. व तो फुकटहि मिळतो, तथापि आपणास हिरे, माणकें, घेण्याचें सामर्थ्य आहे असें दाखविण्याकरितां स्त्रियांस तुऱ्यांपेक्षां तेच अधिक आवडतात.

आपल्या सामर्थ्याप्रमाणें चांगल्या वस्त्रप्रावरणादिकांचा उपभोग करणें यास कांहीं हरकत नाहीं; परंतु सामर्थ्य नसतां मोठे मोठे खर्च करून उंचउंच पोषाक करावे. आणि पुढें आपणास दरिद्री करून टाकावें ही मात्र मोठी दुःखकारक गोष्ट आहे. तसेंच कित्येक लोक धामट, वस्त्रहीन, कळाहीन, असेहि असतात; आणि त्यांना अलंकाराची

फार आवड असते; परंतु असें करणें त्यापेक्षां अलंकारांचा पैसा उपयोगी वस्त्रप्रावरण घेण्यांत व स्वच्छता राखण्यांत घालवावा हें फार बरें. चिंध्या पांघरून आंगावर अलंकार घालणें यासारिखें तिरस्कारक दुसरें कांहीं नाहीं.

आतां यावरून उघड आहे कीं. वस्तूंची कांहीं कारणानीं नुसती इच्छा असली ह्मणजे त्या मूल्यवान् असतात असें नाहीं. मूल्यवान् होण्यास त्यांची कमताईहि कारण आहे; ह्मणजे त्यांचा पुरावा इतका कमी असला पाहिजे कीं, त्या फुकट मिळूं नयेत. तसेंच ज्या वस्तूंची इच्छा आहे, त्यांतून ज्यांचा पुरावा फार थोडा असतो, ह्मणजे त्या मिळायाच्या फार कठीण असतात, त्याच अतिशय मूल्यवान् असतात.

सोनें आणि रुपें हीं लोखंडापेक्षां अधिक मूल्यवान् कां यांचें हें वर सांगीतलेलें कारण होय. जर तीं दिसण्यांत चांगलीं नसतीं, अथवा अगदीं उपयोगी नसतीं, तर त्यांची कोणाला कधींहि इच्छा झाली नसती. परंतु तीं सर्वांस पाहिजेत ह्मणून लोखंडापेक्षां अधिक मूल्यवान् आहेत; कां कीं लोखं-

डापेक्षां त्यांची कमताई फार आहे, व तीं मिळवायास श्रम फार पडतात. सोनें आणि रुपें हीं सर्वत्र सांपडत नाहींत, कोठें कोठें सांपडतात, व तींहि फार थोडीं सांपडतात. विशेषेंकरून सोनें हें मातीमध्यें असतें, तिला सोन्याची माती असें ह्मणतात, ती माती कित्येक नद्यांतील वाळवेंत असती, ह्मणून ती धुवून त्यांतील सोन्याची माती निराळी काढायास व पुनः त्या मातीपासून सोनें निराळें करायास पराकाष्ठेचे श्रम लागतात. पंधरा तोळे रुपें काढायास जितका श्रम व मजूरी वगैरे खर्च लागतो तितकाच सुमारें एक तोळा सोनें काढायास लागतो. आणि याच कारणावरून एक तोळा सोन्याच्या मोबदला पंधरा किंवा सोळा तोळे रुपें येतें.

कोणत्याहि वस्तु सर्व लोकांस अपेक्षित असून त्यांची कमताई असली, ह्मणजे त्यांस मूल्य असतें असें नाहीं, तर वस्तूंस मूल्य असण्यास आणखी एक गोष्ट असली पाहिजे. ह्मणजे त्या अशा असाव्या कीं, त्यांच्या मोबदला कांहीं घेऊन त्या देतां आल्या पाहिजेत मग तें कांहीं असो, त्याची अदलाबदली करितां आली ह्मणजे झालें.

शरीरसंपत्ति ही सर्वांस पाहिजे व ती सर्वांसच असते असें नाहीं. याच कारणास्तव, एकादे वेळीं शरीरसंपत्ति ही मूल्यवान् आहे, असें आपण ह्मणतों; परंतु मूल्य या शब्दाचा जो मुख्य अर्थ तो एथें दाखविला जात नाहीं; कांकीं, कांहीं एक वस्तु मोबदला घेऊन कोणाच्यानेंहि आपली शरीरसंपत्ति दुसऱ्यास देववणार नाहीं. जर असें करितां येतें, तर पुष्कळ श्रीमान् गृहस्थ हजारों रुपये देऊन मोबदला एकाद्या गरीब हेलकऱ्याची शरीरसंपत्ति, आणि सुदृढ शरीराचा बांधा, घेण्यास फार खुषी होतील. आणि कदाचित् तो हेलकरीहि असा सवदा करायास राजी होईल. परंतु काय उपयोग! पाहिजे तर तो आपले अवयव कापून टाकील, तथापि ते त्याच्यानें दुसऱ्यास लाववणार नाहींत; अमित आहारानें तो आपली शरीरसंपत्ति खराब करून टाकील, परंतु दुसऱ्याला देऊं शकणार नाहीं.

## प्रकरण २

हा विषय ज्यांना नवा आहे त्यांनीं हे खालीं लिहिलेले प्रश्न स्वतः आपल्यासच करावे ह्मणजे

त्यापासून त्यांस फार फायदा होईल.

(१) हवा ही मूल्यवान् पदार्थ कां नाहीं? कां-कीं जरी ती फार उपयोगी आहे तरी ती फुकट मिळते.

(२) दुर्मिळ असे कित्येक जातीचे घोडे आ-हेत, व जे कांहीं उपयोगी नाहींत अथवा सुंदरहि ना-हींत ते कां मूल्यवान् नाहींत? कांकीं जरी ते सर्वांस मिळायाजोगे पदार्थ नाहींत तथापि त्यांची कोणा-स इच्छा नाहीं.

(३) निरोगी शरीरप्रकृति ही कां मूल्यवान् नाहीं? कांकीं जरी तिजविषयीं सर्वांस इच्छा आहे व ती सर्वांस मिळतहि नाहीं तरी ती अदेय आहे ह्मणजे एकापासून घेऊन दुसऱ्यास देतां येत ना-हीं ह्मणून ती मूल्यवान् नाहीं.

(४) कुदळ ही कां मूल्यवान् आहे? कांकीं एक तर ती उपयोगी आहे ह्मणून तिची सर्वांस इच्छा आहे; दुसरें. तिचा पुरावा नियमित आहे ह्म-णजे कोणास फुकट मिळत नाहीं: आणि तिसरें ती देय आहे. ह्मणजे एकापासून घेऊन दुसऱ्यास देतां येते.

(५) रुप्याचा चमचा हा कुदळीपेक्षां अधि-

क मूल्यवान् कां? कांकीं जरी तो तिजपेक्षां अधिक उपयोगी नाहीं, तरी रुपें खाणींतून खणून काढण्याचे वगैरे श्रम फार आहेत, ह्मणून त्याचा पुरावा कमी आहे, अथवा तें मिळण्यास फार कठीण आहे.

ज्या वस्तूविषयीं लोकांस फार इच्छा आहे ती श्रमसाध्य असली व श्रमावांचून अगदीं मिळत नाहीं असी असली, ह्मणजे अर्थात् लोक ती मिळविण्याविषयीं श्रम करितात. आणि ज्या वस्तु मोठ्या मूल्यवान् आहेत त्यांना मिळवावयास बहुधा फार श्रम लागले आहेत, असेंच आपल्या पाहाण्यांत येतें. यावरून कित्येक लोक असा तर्क करितात कीं, वस्तूस मूल्य जें येतें ते तिला मिळवायास जे श्रम लागतात त्यांच्या प्रमाणानें येतें. परंतु ही केवळ चूक आहे. कोणत्याहि वस्तूला मिळवायास जे श्रम लागतात त्यांच्या योगानें ती मोठ्या किमतीस विकली जाते असें नाहीं; परंतु उलटी ती मोठ्या किमतीस विकली जाते, ह्मणून लोक तिला मिळविण्याविषयीं फार श्रम घेतात. कोळी लोकांस माशांचें बरोबर मोल मिळतें, ह्मणून ते समुद्रांत जाऊन थंडी वाऱ्यांतून ओलवते माशां-

करितां अतिशय श्रम घेतात; परंतु एका कोळ्यानें सारी रात्र मेहेनत करून एक लहानसा मासा धरिला. व दुसऱ्यानें तितकेच श्रम करून हजारों धरिले; आतां यद्यपि दोघांनीं सारिखेच श्रम केले आहेत. तथापि दुसरा आपले हजारों ज्या किमतीस विकील त्याच किमतीस पहिल्याचा एक विकला जाणार नाहीं. दैवयोगानें असें घडलें कीं. एका हलव्यानें होडीत उडी टाकिली. ह्मणजे अर्थात् त्याला धरायास कांहीं श्रम लागणार नाहींत; परंतु त्याला मिळवायास कांहीं श्रम लागले नाहींत, ह्मणून कांहीं त्याची किंमत कमी होणार नाहीं. तसेंच मोक्तिकमत्स्य खातांनां दैवयोगानें एका मनुष्यास एक मोतीं सांपडलें असतां. त्याची किंमत, तें समुद्रांत बुड्या मारून सांपडलें असतां जी आली असती. त्यापेक्षां कांहीं कमी येणार नाहीं.

याजकरितां एकादी वस्तु मिळविण्याकरितां जे श्रम लागतात त्यांच्या योगानें ती मूल्यवान् होते असें नाहीं; परंतु ती मूल्यवान् असल्यामुळें. श्रमानें प्राप्त करून घेण्यास पात्र होते. मनुष्यानें आळशी व्हावें हें ठीक नाहीं असें जाणून ईश्वरानें आपल्या चातुर्यानें व दीर्घदृष्टीनें वस्तुस्थिति अशी केली आ-

हे कीं, आवश्यक वस्तूंतून श्रम केल्याशिवाय मिळ-तील अशा थोडक्याच आहेत. असा ईश्वरी नियमच आहे कीं. मनुष्यानें आपल्या निढळच्या घामाची भा-कर खावी, आणि ह्मणूनच बहुतेक उपजीवनावश्यक पदार्थ व तसेच सुखोपभोग्य पदार्थहि श्रम केल्या-वांचून प्राप्त होत नाहींत.

## पाठ ६.

## मजूरी.

### प्रकरण १.

कित्येक मजुरांस इतरांपेक्षां अधिक मजूरी मिळते. नांगऱ्यांपेक्षां सुतार अधिक कमावितो; आणि घड्याळजी, या दोघांहिपेक्षां अधिक मिळवितो. आणि हें एकापेक्षां दुसरा फार श्रम करितो, ह्मणून होतें असें नाहीं.

ही गोष्ट शारीरश्रम करणारांविषयीं जशी आहे, तशीच मानसिकश्रम करणारांविषयींहि जाणावी पेढीवरच्या कारकून, ज्याला सर्व हिसाब बराबर राखण्याचे श्रम करावे लागतात, त्याला न्यायशास्त्री अ

णजे काम जसें मूल्यवान् असतें त्याप्रमाणे ते करणारास अधिक वेतन मिळतें.

परंतु मूल्य कशावर असतें? कोणत्याहि जातीच्या कामाचें मूल्य इतर वस्तूंच्या मूल्याप्रमाणेंच आहे. कामाच्या पुरव्याप्रमाणें ह्मणजे तें मिळविण्याच्या श्रमाप्रमाणें त्याचें मूल्य कमजास्त असतें. एक शेर तांबें काढण्यास जो श्रम, काळ आणि खर्च लागतो, त्यापेक्षां एक शेर सोनें काढायास जर अधिक न लागता तर सोन्याचें मूल्य तांब्यापेक्षां अधिक असतें ना.

परंतु सुतार, नांगरी यांपेक्षां घड्याळजी, शस्त्रवैद्य वगैरे यांचीच कां फार कमताई असते? ह्मणजे एका मनुष्यास नांगरी करण्यापेक्षां घड्याळजी करणें अथवा शस्त्रवैद्य करणें हें कां कठीण असतें?

याचें मुख्य कारण हें आहे कीं, त्या कामास आवश्यक विद्याभ्यासास खर्च फार लागतो. शस्त्रवैद्य अथवा घड्याळजी यांस काम चालविण्याजोगें ज्ञान प्राप्त होण्याच्या पूर्वी तें शिकण्यामध्यें फार



काळ घालवावा लागतो. ह्मणून तितका काळ पर्यंत च-रितार्थ चालविण्याचें, व ती कळा शिकवणाऱ्या गुरूस पगार देण्याचें सामर्थ्य असलें पाहिजे; नाहींपेक्षां कोणाच्यानेंहि घड्याळची अथवा शस्त्रवैद्य होववणार नाहीं. ज्याच्या अभ्यासास फार खर्च लागत नाहीं, असा जो सुतार त्यापेक्षां, आपल्या मुलास अधिक मिळविण्याची आशा नाहीं असें जर बापास वाटेल तर जरी त्याला खर्च करण्याचें सामर्थ्य असलें, तथापि तो आपल्या मुलास शस्त्रवैद्य अथवा घड्याळची करण्याच्या मोठमोठ्या खर्चांत पडणार नाहीं.

परंतु जर मुलगा आळशी अथवा मूर्ख निघाला, तर आपल्या धंद्यानें आपलें उपजीवन करायाजोगें त्याच्या आंगीं सामर्थ्य येत नाहीं; ह्मणून त्याच्या बापाचा आशाभंग होतो, आणि अर्थात् त्याच्या मुलाच्या अभ्यासाचा खर्च फुकट जातो. कांकीं मेजाचा पाय नीट करण्याकरितां सुतारास जें मिळतें त्यापेक्षां, मनुष्याचा पाय नीट करण्याकरितां शस्त्रवैद्यास अधिक मिळतें खरें, परंतु तें त्याच्या विद्याभ्यासास खर्च फार लागलेला असतो ह्मणून मिळतें असें नाहीं; अभ्यासास खर्च फार लागतो त्यामुळे लोक शस्त्रवैद्य होण्याच्या

रावा फार थोडा असतो. आणि पुरावा थोडा असल्यामुळे त्यास अधिक द्यावें लागतें.

पदार्थांच्या पुरव्याप्रमाणें जसें त्याचें मूल्य कमी अथवा जास्ती असतें, त्याप्रमाणेंच, कोणत्याहि जातीच्या कामाचें मूल्य त्याच्या पुराव्याप्रमाणें अधिक अथवा उणें असतें, हें यावरून उघड आहे.

एका मनुष्यास दुसऱ्यापेक्षां अधिक मिळकत होण्यास अभ्यासाचा खर्च हा जसा कारण होतो त्याप्रमाणेंच मनुष्याची स्वाभाविक बुद्धि हीहि कारण होते. ज्याला चित्रें काढण्याविषयीं स्वाभाविक बुद्धि आहे तो, साधारण चित्रकाराच्या अभ्यासास जो खर्च लागतो, त्यापेक्षां कमी खर्चानेंहि बहुधा तरबेज होईल; आणि मग अर्थात् तो साधारण चित्रकारापेक्षां अधिक मिळवील; आणि पुनः त्याजपेक्षां त्याला फार श्रमहि करावे लागणार नाहींत; परंतु ज्याला स्वाभाविक बुद्धि आहे, त्याला त्याच्या कामाकरितां इतरांपेक्षां अधिक कां मिळतें, याचेंहि कारण वर सांगीतलेलें हेंच आहे. बुद्धिमान् मनुष्य फार थोडे असतात, तेव्हां अर्थात् त्यांचा पुरावा कमी असतो, आणि त्यांचा पुरावा कमी असतो ह्मणूनच त्यांचीं



पुनः कित्येक जातीचीं कामें करणारे आहेत, त्यास अधिक मिळतें, परतु तें त्या कामास स्वाभाविक बुद्धि पाहिजे ह्मणून, अथवा त्याच्या अभ्यासास फार खर्च लागतो ह्मणून मिळतें असें नाहीं; तर कांहीं दुसऱ्या कारणानें त्यांचा पुरावा कमी असल्यामुळें त्यांस अधिक मिळतें. प्रकृतीस अहितकारक अथवा भयंकर किंवा घाणेरीं अशीं कामें करणारे यांस अधिक द्यावें लागतें, कांकीं तसें केल्याशिवाय तीं कामें करण्यास कोणी धजणार नाहीं. घरांस रंग देणारे, खाणींत खणणारे, बंदुकीची दारू करणारे, व अणखीहि दुसरे कित्येक जातीचीं कामें करणारे, या सर्वांविषयीं असेंच जाणावें.

---

## प्रकरण २

जो कोणी आपणापेक्षां अधिक श्रमाचें काम करीत नाहीं, त्याच्या इतकें आपणास मिळूं नये, ही गोष्ट मोठी अन्यायाची आहे, असें कित्येकांस वाटतें. जर एक मनुष्य दुसऱ्यास, आपल्या मनास वाटेल ती मजुरी देऊन आपलें काम करण्याविषयीं बलात्कार करील, तर खरोखरी मोठी अडचण पडेल. सेवकाविषयींहि

घालून दुसरें जें कांहीं आवश्यक असेल, तें मात्र त्यांनां देऊन त्यांपासून काम घेतों, त्याप्रमाणेंच धनी दासांपासून बलात्कारानें आपलें काम करवितात. तसेंच, जरी आपण कोणी एकास आपल्या मर्जीस येईल ती किंमत देऊन त्याचें काम अथवा त्याचें वस्त्र अथवा त्याचें गुरुं, अथवा दुसरें कांहीं विकत देण्याविषयीं त्याजवर बलात्कार केला, तरी हीहि मोठी अडचण होईल. परंतु विकत घेणारांस आणि विकत देणारांस त्यांच्या इच्छेप्रमाणें करण्यास मोकळीक दिली असतां कांहींच अडचण पडणार नाहीं. एकानें, योग्य वाटेल त्या किमतीस सांगावें, आणि दुसऱ्यानें, त्या जिनसास योग्य वाटेल तें द्यावें. कामकरी हा काम विकणारा होय आणि त्याचा योजक (ह्मणजे त्यास चाकरीस ठेवणारा) हा तें काम विकत घेणारा होय; त्या दोघांसहि आपल्या इच्छेप्रमाणें करण्यास मोकळीक असावी हें फार चांगलें.

जर कोणी एक मनुष्य नेहेमी आपल्या बटाट्यास अथवा गाईस फार किंमत सांगत असेल, तर पाहिजे असल्यास त्याणें तसें करावें, त्याला मोकळीक आहे. परंतु दुसऱ्याची इच्छा असो अगर नसो, तितक्याच कि-



परंतु दुसऱ्याची इच्छा असो अगर नसो, त्याला आपणास कामावर ठेवण्याविषयीं जरूर पाडणें ही मात्र मोठी जुलुमाची गोष्ट होईल. हाच नियम मजुराला लाविला, तर त्यालाहि असेंच वाटेल; ह्मणजे शिंपी, सुतार, आणि चांभार यांणीं त्याला त्यांच्या इच्छेस येईल त्या किंमतीस आपला माल घेण्याविषयीं जरूर पाडलें (मग त्याची इच्छा असो अगर नसो.) तर त्यालाहि हा मोठा जुलूम असें वाटेल.

मागें कित्येक देशांमध्यें, मजुरांची मजुरी ठरविण्याकरितां कायदे करीत असत. प्रत्येक जातीच्या कामाची मजुरी, कायद्यानें ठरविलेल्या मजुरीपेक्षां कोणी अधिक किंवा उणी मागितली असतां अथवा कोणी दिली असतां, त्याला मोठी शिक्षा ठरविली असे. परंतु या कायद्यापासून कांहीं एक फायदा झाला नाहीं; कांकीं शेतांत खपणाऱ्या मजुरांच्या मजुरीच्या कायद्यानें ठरविलेला दर साधारण मजुरीच्या दरापेक्षां जास्ती असला ह्मणजे शेतकऱ्यानें कांहीं चां-

वें; आणि जें काय थोडेंसें चांगलें शेत असेल त्याची मात्र लागवड करावी. येणेंकरून धान्य थोडें पिके व जे कांहीं मजूर रिकामे बसत ते त्यांपेक्षां कमी दरानेंहि मजुरी घेऊन काम करायास सिद्ध असत; परंतु त्यांना कांहीं मिळत नसे. तसेंच जेव्हां ठरविलेला दर, चांगल्या हुशार अशाहि मजूराच्या वास्तविक मजूरीपेक्षां कमी असे, तेव्हां सहजच कित्येक शेतकरी चांगल्या चांगल्या मजूरांस गुप्तरूपें कांहीं देऊन आपल्याकडे ठेवण्याविषयीं यत्न करीत. धान्य कमी दरानें देण्याचें कबूल करून अथवा दुसऱ्या कोणत्या एकाद्या युक्तीनें कायद्यांत न सांपडतां, हें असें ते शेतकरी सहज करूं शकत; आणि मग आपल्या येथील सर्व चांगले चांगले मजूर जाऊं नयेत ह्मणून इतर शेतकऱ्यांसहि तसेंच करावें लागे. याप्रमाणें हे कायदे अगदीं निरुपयोगी होऊन जात.

सर्व मजुरांस आणि त्यांच्या योजकांस तसेंच विकणारांस आणि विकत घेणारांस जें योग्य दिसेल तें मागायास आणि द्यावयास आणि त्यांच्या इच्छेस आल्यास एकमेकांसीं असा व्यवहार करायास मोकळीक असावी हें फार चांगलें.



कित्येक लोक असें मानितात कीं, मजुरीच्या भावाचा चढ उत्तर हा इतर पदार्थांच्या किमतीप्रमाणें होत असतो. ते अशी कल्पना करितात कीं, जेव्हां दाणा महाग असतो, तेव्हां मजुरी जास्त असावी, आणि जेव्हां दाणा सस्ता असतो, तेव्हां मजुरीहि त्याप्रमाणानें कमी असावी; ह्मणजे दाण्याचा भाव चढला अथवा उतरला, तथापि त्यांत मजुरांचा वास्तविक नफा तोटा कांहींच नाहीं.

परंतु जो कोणी विचारपूर्वक शोध करील त्याची, हें केवळ विपरीत आहे, अशी खात्री होईल. मजुरी हि अन्यसामग्रीच्या किमतीप्रमाणें चढत नाहीं किंवा उतरतहि नाहीं; आणि हें असें व्हावयास कांहीं कारणहि दिसत नाहीं. साधारण मजुरापेक्षां एकादा चांगला शिल्पी ज्यास्त मिळवितो; याचें कारण आपण वर उघड करून दाखविलेंच आहे कीं, शिल्पी याचें काम सस्तें मिळत नाहीं ह्मणून त्याला ज्यास्त द्यावें लागतें. आणि याच कारणावरून जेव्हां कोणत्याहि जातीच्या मजुरांची कमताई असती, (जशी एकाद्या नव्या वसाहतीच्या ठिकाणीं) तेव्हां तेथें मजुरीचा भाव अधिक असतो. कांकीं, त्यांचे योजक त्यांकरितां अगदीं टपलेले असतात ह्मणून ते आपणाला पुष्कळ मजूर मिळविण्याकरितां मजुरीच्या भाव

तथापि मजूर लोक, ज्यास्त मिळत असतां, कमी मजुरी घेऊन काम करायास जाणार नाहींत.

तसेंच, जेव्हां पुष्कळ मजूर कामाकरितां टपलेले असतात, तेव्हां आळशी बसून उपाशीं राहावें त्यापेक्षां, हलक्या मजुरीवरहि जावें हें त्यांस बरें वाटतें. हलक्या मजुरीनें मजूर मिळत असतां ते टाकून, धान्याची माहागाई आहे ह्मणून कोणीहि भारी मजुरी देणार नाहीं. अथवा महागाई असल्यामुळें कोणालाहि मजूरांचें काम पहिल्यापेक्षां अधिक मूल्यवान् होणार नाहीं. जेव्हां धान्याचा भाव चढलेला असतो, तेव्हां वस्त्राचा अथवा लोखंडी सामानाचाहि भाव चढलेला असतो असें केवळ नाहीं; ह्मणून कोष्ट्याचे अथवा लोहाराचे मजूरांचें काम, त्याला पूर्वी होतें, त्यापेक्षां अधिक किमतीचें होणार नाहीं.

जेव्हां धान्याची फार महागाई असते, तेव्हां प्रसंगोपात्त शेतकरी किंवा व्यापारी यांनीं जितकी मजुरी अधिक देववेल तितकीहि दिल्ही, तथापि ती त्यांच्या मजुरांच्या पोषणास पुरत नाहीं, याकरितां त्यांतून कित्येकांस रजा द्यावी लागते. मग ते दुसऱ्या कोणीकडे तरी काम पाहातात.



पुनः सराईस दाणा कितीहि सस्ता असला, तथापि मजुरांची हाकाटी पडली ह्मणजे नुसत्या पोटास जें काय लागेल, त्यापेक्षां पुष्कळ ज्यास्तहि मजूरी देऊन मजूरांस कामावर बोलावणें शेतकऱ्यांस सोईवार पडतें.

तात्पर्य, मजूरीचा भाव कमजास्त होणें हें अन्नसामग्रीच्या किमतीवर आहे असें नाहीं; परंतु मेहनतीचा जसा खप आणि पुरावा असेल त्याप्रमाणे तिचा भाव चढतो अथवा उतरतो, ह्मणजे जशी मजूरांची गरज असती त्याप्रमाणें त्यांच्या मजूरीचा भाव चढतो अथवा उतरतो. जेव्हां मजूर कामाची वाट पहात असतात, तेव्हां मजुरी उतरते; आणि जेव्हां लोक मजूरांची वाट पहात असतात तेव्हां ती चढते.

मजूर लोक, बहुधा चालत्या काळावरच दृष्टि देतात, आणि आपल्याच मूर्खपणानें झालेल्या गोष्टीविषयीं इतरांस दूषित करितात; परंतु असें न करितां, जर अमळ दूरवर विचार करितील, तर जी संकटें त्यांना वारंवार प्राप्त होतात, त्यांपासून ते सुरक्षित राहतील. कित्येक मजूर बरेंच वेतन मिळवीत असतां त्यांतून विपत्तिकाळाकरितां कांहीं एक संग्रह क-

सतां, अथवा त्यांस कांहीं काम नसतां, तेव्हां त्यांस फार विपत्ति भोगाव्या लागतात. परंतु या विपत्तीचें कारण पाहूं गेलें असतां दुसरें कांहीं नाहीं. फक्त त्यांची अल्पदृष्टि होय. अशा लोकांस ही खालीं लिहिलेली गोष्ट विशेष लक्ष देऊन वाचायाजोगी आहे.

"हिंवाळ्यामध्यें थंडीनें व भुकेनें पिडलेला असा एक टोळ, एका मोठ्या मधीच्या पोळ्याजवळ येऊन त्यावरील मधमाशांची मोठ्या लीनतेनें विनवणी करूं लागला कीं, थोड्याशा मधीच्या थेंबानी या विपत्तिकाळीं माझें सहाय करावें. तें ऐकून एक माशी त्याला ह्मणूं लागली कीं, तूं उन्हाळ्यामध्यें आपला काळ कसा घालविलास, आमच्या सारखा अन्नाचा संग्रह करून कां ठेविला नाहींस? तेव्हां त्या टोळानें उत्तर केलें कीं मी आपला काळ खरोखरी खाणें, पिणें, गाणें, बजावणें, यांत मोठ्या आनंदानें घालविला. त्यासमयीं, हिंवाळ्याविषयीं कांहीं एक विचार माझे मनांत आला नाहीं. माशी ह्मणाली; आमच्या काळक्रमणाचा प्रकार तुझ्यापेक्षां केवळ विपरीत आहे. पुढें आपल्यास अन्नाची गरज लागेल अ-



सा विचार करून अन्नसंग्रह करण्याकरितां आह्मीं सर्वांनी पराकाष्ठेचे श्रम केले; ह्मणून आतां आह्मांस सुखाचें खावयास मिळतें. परंतु जे उन्हाळ्यामध्यें आपला वेळ खाण्यापिण्यांत व गाण्याबजावण्यांत घालवितात, त्यांनीं हिंवाळ्यामध्यें उपाशीं राहण्याचीच आशा करावी."

---

## पाठ ७

### गरीब आणि मातबर.

### प्रकरण १

जे लोक (कोणी हलक्या दरानें कोणी भारी दरानें वेतन घेऊन) आपल्या चरितार्थाकरितां काम करितात, त्यांशिवाय आणखी कित्येक लोक आहेत, ते आपल्या उपजीविकेकरितां अगदीं श्रम करीत नाहींत; ते आपल्या किंवा आपल्या वडिलांच्या संग्रहावर उपजीविका चालवितात. ह्या श्रीमान् गृहस्थांमध्यें असेहि कित्येक आहेत कीं, ते कोतवालाचें, मुनसफाचें वगैरे मोठीं मेहनतीचीं कामें करितात, परंतु ते सर्व आपल्या खुशीनें करितात. उपजीविकेकरितां करितात असें नाहीं;

ज्यांस आपल्या उपजीविकेकरितां श्रम करावे लागतात. त्यांच्याशीं या मातबर लोकाची तुलना करून पाहतां, हे फार थोडे आहेत. जेथील सर्व अथवा बहुतकरून लोक मेहनतीवांचून उपजीविका चालवायाजोगे शक्तिमान् आहेत, असा जरी एकहि देश नाहीं, तरी असे कित्येक देश आहेत कीं, तेथील सर्वच लोक गरीब आहेत; ह्मणजे तेथील सर्व लोकांस उपजीविकेकरितां श्रम करावे लागतात. अशा देशांतील लोकांची स्थिति सुधारल्या देशांतील मजुरांपेक्षांहि फार वाईट असते. ज्या देशांत मालमत्तेचें रक्षण होतें, व लोक उद्योगी असतात, तेथील लोकांची संपत्ति निरालस वाढत जाते; आणि जे उद्योगी व पराकाष्ठेचे मितव्ययी असतात, ते, जे आळशी व उधळे असतात त्यांपेक्षां अधिक मिळवितात, व आपल्या मुलांकरितां संग्रहहि करून ठेवितात. मग अर्थात त्यांचीं मुलें गर्भश्रीमंत होतात; परंतु रानटी देशांत ह्मणजे जेथें मालमत्तेचें रक्षण नसतें, तेथील लोक अर्धे उघडे असून अर्धे उपाशींहि असतात.

जे तरुण लोक आपल्या काळाचा चांगला व्यय



करितात, आणि त्वरित विद्याभ्यास करून दिवसानुदिवस उद्योगी होतात, ते कदाचित् त्यांच्या उपजीविकेस जें काय लागेल, त्यापेक्षां अधिकहि मिळविण्यास शक्तिमान् होतील; आणि मग, आपल्या मुलांस कांहीं संग्रह करून ठेविला आहे असें पाहून त्यांस समाधान वाटेल. पुनः तीं मुलें या जिंदगीचा व्यय न करितां प्रमाणिकपणानें, मेहनतीनें, शाहाणपणानें आणि मितव्ययानें जर ती वाढवितील, तर कांहीं काळांत तीं मोठीं संपत्तिमान् होतील. पुष्कळ लोक आरंभीं अगदीं गरीब असतां अशा क्रमानें मोठ्या श्रीमंतीस चढले आहेत. यावरून पुष्कळ गरीब लोक श्रीमंत होऊं शकतील असें नाहीं, व कोणालाहि असें होण्याविषयीं निजध्यास लागणें हेंहि योग्य नाहीं, परंतु आपली स्थिति नीट करण्याची व आपल्या मुलांबाळांची चांगली संस्था करून ठेवण्याविषयींची आशा करण्याविषयीं कोणास प्रतिबंध नाहीं ही फार चांगली गोष्ट आहे.

कोणालाहि, आपल्या मुलांकरितां कांहीं संग्रह करून ठेवायास अधिकार नसणें, ही मोठी कठीण गोष्ट आहे असें आपणास वाटणार नाहीं काय? परंतु कित्येक देशांत ही अशी दुष्चाल आहे, तेथें जिंदगीच्या रक्षणावि

षयीं इतकी उपेक्षा असते कीं, कोणत्याहि मनुष्याला अंतकाळीं आपली सर्व जिंदगी जुलुमास्तव द्यावी लागती, नाहीं तर जबरदस्तीनें घेऊन जातात. अशा या भयंकर चालीमुळें सर्व लोक फारच गरीब असतात; कांकीं कोणालाहि संग्रह करून ठेवणें हें योग्य वाटत नाहीं.

कित्येक देश आहेत ते पूर्वी फार फलद्रूप होते, व तेथें वस्तीहि फार होती; परंतु ते आतां, तुर्क व त्यासारिखेच कित्येक लोक यांच्या जुलुमानें अगदीं ओसाड पडले आहेत. मागें बरबर देशांत, रेशीम उत्पन्न होत असे; परंतु आतां तेथील सर्व तुतीचीं झाडें मरून गेलीं आहेत, आणि नवीं लावण्याविषयीं कोणीहि उद्योग करीत नाहींत. कांकीं उत्पन्नाच्या उपभोग करायास सांपडेल असा त्यांला भरंवसा नाहीं.

---

## प्रकरण २

जर सर्व श्रीमंतांची जिंदगी घेऊन गरीबांस वाटून दिल्ही, आणि पुढें श्रीमान् होण्याविषयीं कोणालाहि मोकळीक दिल्ही नाहीं, तर त्यापासून गरीबांचें कांहीं बरें होईल कायी नाहीं, अगदीं नाहीं, उलटें आतां आहे त्यापेक्षां फार वाईट होईल. त्यांना आतां आपल्या उपजीविकेकरितां

सें कांम करावें लागतें, तसेंच तेव्हांहि करावें लागेल; कां- कीं, अन्न वस्त्र हें कोणत्याहि मनुष्याच्या श्रमावांचून प्राप्त होणार नाहीं. परंतु आतां असें काम करणें त्यांना हितावह होतें तसें तेव्हां होणार नाहीं; कांकीं, वर्ष दोन वर्षें पर्यंत ज्यापासून कांहीं एक मिळकत व्हावयाची नाहीं, अशा कामाकरितां, आतां देतात त्याप्रमांणे अगाऊ मजुरी देण्यास, आणि एकादा चांगला कारखाना घालण्यास, अथवा शेत करण्यास कोणीहि शक्तिमान् होणार नाहीं. कांहीं एक संग्रह करून न ठेवितां, फक्त पोट भरण्यापुरतें पिकें एवढें लाहानसें जमीनीचें थळ लावून "रोज मजुरी बलाय दूर" या ह्मणी प्रमाणें प्रत्येक जण करील कांकीं, जर तो मातबर झाला असें समजलें, तर त्याची सर्व जिंदगी घेऊन वांटून दिल्ही जाईल असें त्याला भय आहे.

जर पीक न आल्यामुळें अथवा कुटुंबास कांहीं दुखणें लागल्यामुळें, एकाद्या मनुष्यास विपत्ति प्राप्त झाली; (असें पुष्कळास होतें) तर थोडीशी जिंदगी असेल ती संपविल्यावर मग त्यानें काय करावें? अशा प्रसंगीं तो मजुरी करील, परंतु ज्यापासून तत्काळ मिळकत होते, अशा एकाद्या धंद्याशिवाय कोणीहि त्याला कामास लावणा-

र नाहीं. कांकीं, जरी एकाद्यानें कांहीं थोडासा संग्रह केला असला, तथापि लागलाच तो चुकाडला जाईल, या भीतीस्तव कोणाच्यानेंहि तो वापरायास बाहेर काढवणार नाहीं. तो जमीनीमध्यें पुरून लपवून ठेवील. ही चाल पूर्वीं या देशांत फार होती, आणि अद्यापीहि कित्येक देशांत, जेथें मालमत्तेचें अगदीं रक्षण होत नाहीं, तेथें चालत आहे. अशी सर्व अव्यवस्था असली, ह्मणजे प्रतिवर्षीं देश अधिकाधिक गरीब होत जातो. कांकीं, प्रत्येक मनुष्य तात्कालिक उपयोगापुरतें श्रम करील, आणि तेहि, कामाचें विभागकरण नसल्यामुळें फारसे हितावह होणार नाहींत; आणि कांहीं वस्तु जवळ बाळगण्याची परवानगी मिळायाची नाहीं, अशी खातरी असल्यामुळें संग्रह करण्यास कोणीहि प्रयत्न करणार नाहीं. आणि परिणामीं, सर्व देशांतील जमीनीचें आणि श्रमाचें उत्पन्न दिवसानुदिवस कमी होत जाईल; मग लोकांची स्थिति फार भयंकर होईल. श्रीमान् मात्र गरीब होऊन जातील खरे; परंतु गरिबांची स्थिति चांगली होण्याचें एकीकडे राहून उलटी पूर्वीपेक्षां अधिक वाईट होईल. जसे आतां कित्येक निराश्रित भिकारी आहेत, त्याप्रमाणे सर्व लोक होतील. खरो खरी इतकी त्यांची स्थिति होऊन जाईल कीं, अस-

त्यापाशीं जाऊन कांहीं मागावें असा कोणीहि राहणार नाहीं.

श्रीमंती, गरिबी, आणि मध्यमस्थिति, या तीनहि स्थितींत राहणारांस, मालमत्तेचें रक्षण व्हावें, आणि प्रत्येकास त्याचें ह्मणून जें काय असेल, तें बाळगायास परवानगी असावी; तसेंच दुसऱ्याचा नाश न करितां, प्रमाणिकपणें जितकें त्याच्यानें मिळववेल तितकें मिळवायास आणि योग्य वाटेल तर तें ठेवायास किंवा खर्चायासहि मोकळीक असावी हें फार चांगलें.

कित्येक श्रीमान् गृहस्थ आपल्या द्रव्याच्या इतरांपेक्षां बराच चांगला उपयोग करितात; परंतु एकादा जो अगदीं आत्मस्वार्थी असतो, त्याच्यानेंहि आपल्या शेजाऱ्याकरितां कांहीं खर्चिल्यावांचून राहववत नाहीं. एका गृहस्थास पन्नास हजार रुपयांची सालाची प्राप्ति असली, तर प्रथमतः कित्येकांस असें वाटेल कीं, ती त्याची मिळकत शंभर गरीब कुटुंबांस वांटून दिली असतां प्रत्येकास पांचशें रुपये येतील, आणि अशा योजनेनें तीं शंभर गरीब कुटुंबें पहिल्यापेक्षां आपलें उपजीवन करण्यास अधिक शक्तिमान होतील. परंतु ही त्यांची चूक आहे; कांकीं, स-

र तो श्रीमान् गृहस्थ शंभर कुटुंबांचें अन्न एकटाच खाईल, आणि जितकें त्या शंभरांस वस्त्रप्रावरणास लागेल, तितकें याला एकट्यालाच लागेल, तर मात्र अशा वांटणीनें शंभर गरीब कुटुंबें अधिक चांगल्या रीतीनें निर्वाह करितील; परंतु आपणांस खचित माहित आहे कीं अशी गोष्ट नाहीं. तो आपल्या प्राप्तींतून, चाकर, मजूर, व्यापारी आणि नाना तऱ्हेच्या जिनसांचे कारखानदार, यांस पगार देतो; आणि ते, तो पैसा आपआपल्या कुटुंबांसाठीं अन्नवस्त्राकरितां खर्चितात. तर वास्तविक पाहातां, अशानेंहि तो पैसा त्यांपासून घेतल्याप्रमाणेंच होतें. जर तो आत्मस्वार्थी असला, तर कदाचित् त्या गरीब कुटुंबांच्या उपजीविकेची काळजी वागविणार नाहीं, तरीहि तोच त्यांची उपजीविका चालवितो, यांत संशय नाहीं. कारण जर त्याने एक हजार रुपये चांगल्या तसबिरा काढण्यांत खर्चीयाचे, असा बेत केला, तर त्या कामांत जे चितारी लागतील, त्यांचें इतक्या चांगल्या रीतीनें उपजीवन चालेल कीं, जसें काय त्यांस त्या पैशाचें बक्षीस देऊन रिकामे बसवून ठेविले. भेद मिळून इतकाच कीं, त्यांना धर्मावर उपजीवन करितो असें वाटायाचें त्या ठिकाणीं, प्रामाणिकपणानें आपल्या पोटास मिळवितों असें वाटेल. परंतु त्यांस रिकामे बसवून ठेवलें अथवा चित्रें

काढायास लाविलें, तरी दोनहि गोष्टी सारख्याच; कांकीं देशांतील अन्नवस्त्रांची क्षयवृद्धि दोहोंतहि सारखीच असते.

परंतु तो श्रीमान् गृहस्थ, आपली सर्व प्राप्ति खर्चायाची ती न खर्चितां, जर त्यांतून बहुतेक शिलक ठेवील, तर बहुतकरून हा संग्रह, अणखी अधिक उद्योगी मनुष्यांच्या उपजीविकेस साधन होईल. कांकीं, सांप्रतकाळीं, जो मनुष्य आपल्या पैशाचा संग्रह करील, तो बहुधा प्राचीन काळाप्रमाणें त्याचें सोनें घेऊन पुरून ठेवणार नाहीं; परंतु कोणापासून तरी चांगलें तारण घेऊन, त्यास तो पैसा व्याजी देईल. अशी कल्पना करावी कीं, कोणी एक मनुष्य, दर वर्षीस एक हजार रुपये तसबिरी काढण्यांत खर्चायाचे ते न खर्चितां संग्रह करून ठेवितो, तर बहुतकरून ती रकम, शेतकरी, कारखानदार, अथवा व्यापारी व्याजीं घेऊन जातील; आणि तेणेंकरून शेतांत अथवा कारखान्यांत मजुरांस खपवून, वस्त्रें अथवा दुसरे उपयोगी पदार्थ उत्पन्न करून, किंवा परदेशांतून माल खरीदी करून आणून व्याज भागून कांहीं शिलक राही इतका नफा ते सहज मिळवितील. आणि अशा तजविजीनें पुष्कळ मजुरांचीं पोटें भा-

लून देशांमध्यें अन्न, वस्त्र इत्यादि अनेक पदार्थांची वृद्धि होईल.

ह्मणून, द्रव्याचा बहुतेक भाग श्रीमंतांनीं आटोपिला आहे असें जरी आपणास वाटतें, तरी वास्तविक पाहातां तें सारें ते एकटेच संपवीत नाहींत; तें त्यांच्या द्वारें इतरांस वांटलें जातें, आणि अशा रीतीनें वांटलें जातें हें, दुसऱ्या कोणत्याहि तजविजीनें वांटून द्यावें, त्यापेक्षां फार चांगलें आहे.

## प्रकरण ३

श्रीमंतांमुळें गरिबांस फार विपत्ति प्राप्त होतात, अशीजी साधारण लोकांची समजूत, ती खोटी आहे असें वर सांगीतलेंच आहे; परंतु आणखी खालीं लिहिलेल्या पोट आणि अवयव यांच्या कल्पित गोष्टीवरून ती अगदीं उघड रीतीनें ध्यानांत येईल.

"एका समयीं शरीराचे सर्व अवयव कुरकुर करून ह्मणूं लागले कीं, आह्मीं सर्वांहीं मेहेनत करून मिळवावें, आणि या पोटानें रिकामें बसून खावें, हें ठीक नाहीं; ह्मणून त्या सर्वांनीं एक मत करून, आजपासून या आळशी पोटाच्या अगदीं नादीं लागूं नये, व

त्याकरितां कोणी एकानेंहि कांहीं कांम करूं नये, असा बेत केला. पायांनीं, त्याला इकडे तिकडे नेण्याविषयीं नकारिलें; हातांनीं, निश्चय केला कीं आह्मीं, इतःपर तोंडामध्यें एक घांसहि उचलून घालणार नाहीं; नाकानें, त्याकरितां श्वास घेण्याविषयीं; आणि डोळ्यांनीं, त्याकरितां पाहाण्याविषयीं नकार केला; आणि कान ह्मणाले, जेवायास कोणी हांक मारिली असतां आह्मीं ऐकणार सुद्धां नाहीं. याप्रमाणें सर्वांहीं निश्चय केला. परंतु कांहीं वेळ पर्यंत पोट रिकामें राहि त्यामुळें त्या सर्वांस मोठ्या विपत्ति प्राप्त झाल्या; हातपाय अगदीं गळून गेले; डोळे बोटभर खोल गेले. याप्रमाणें सर्वांची अवस्था होऊन शरीर अगदीं फिक्कट पडून अगदीं हलक होऊन गेलें."

त्या समयीं सर्व अवयवांस पोट ह्मणालें "मूर्खहो, पाहा कीं, जें तुह्मी मला ह्मणून पुरवीत होतां, तें वास्तविक पाहातां तुमच्याच उपयोगीं पडत असे; जें अन्न मी खात असें, तें मी आपल्या करितां खात नसें; तर तुह्मा प्रत्येकाकरितां निरनिराळ्या धमन्यांतून रक्त गेलें पाहिजे, ह्मणून तें उत्पन्न करण्याकरितां खात असें. जर तुह्मी माझें पोषण कराल, तर मी, ज्या रक्ताशयानें तुमचें रक्षण होतें. तो नेहमीं रक्तानें भरलेला ठेवीन."

आतां हें उघड आहे कीं, जरी श्रीमंत लोक आपणाशिवाय दुसऱ्या कोणाचेंहि बरें करण्याविषयीं काळजी वाहात नाहींत, तथापि त्यापासून इतरांचें बरें झाल्याशिवाय राहात नाहीं. इतकें मात्र खरें आहे कीं, आपल्या शेजाऱ्याचें बरें करण्याचा जर त्याचा हेतु अथवा इच्छा नाहीं, तर त्यांत त्याचा कांहीं गुण घ्यावयाचा नाहीं. कोणी एक साधु ह्मणतो कीं "जो मनुष्य इतरांस संकटापासून सोडविण्याचा आणि त्यांना मदत करण्याचा योग्य उद्देश मनांत आणून धर्म करायास सिद्ध आहे, तो परलोकीं चिरकाल सुखभोगण्यासाठीं, चांगलें संचित करून ठेवित आहे, असें समजावें." यावरून आणि अशाच दुसऱ्या साधूंच्या वचनावरून उघड आहे कीं, ज्या मालमत्तेच्या रक्षणानें गरीब आणि मातबर यांमध्यें भेद राहातो, तें नसावें अशी त्यांची इच्छा नाहीं. कारण कीं, जर ते कोणास श्रीमान् होण्याविषयीं मोकळीक देत नाहींत, तर गरिबावर दया धर्म करीत असावा, असें जें त्याचें श्रीमंतास सांगणें त्यास दोष येतो. जें कांहीं कोणाएकाचें आहे त्यांतून कांहीं खर्चणें अथवा देणें हें जर त्याच्या इच्छेवर ठेविलें नाहीं, तर गरिबास देण्याची बुद्धि ह्मणजे धर्मबुद्धि ह्मणून जो काय मनुष्याचा सद्गुण तो मुळींच नाहीं.

सा होईल. आपल्या इच्छेप्रमाणें ज्याची व्यवस्था करणें आपल्या स्वाधीन नाहीं, त्याला आपलें असें ह्मणतां येत नाहीं. धर्मबुद्धि ह्मटली ह्मणजे ती मनापासून असली पाहिजे. आणि कोणी एक जी कांहीं एकादी वस्तु देतो ती बंद करणें ह्मणजे न देणें जर त्याच्या स्वाधीन नाहीं, तर ती वस्तु तो देतो असें ह्मणवत नाहीं. प्रेषित पॉल हा सांगतो कीं "प्रत्येक जण जसा आपल्या अंतःकरणांत निश्चय करितो तसें त्यानें द्यावें दुःखानें देऊं नये; कारण जो संतोषानें देतो त्याजवर देव प्रीती करितो."

ज्यापेक्षां मनुष्यास आपलें अंतःकरण सांगेल त्याप्रमाणें आपल्या पैशाची व्यवस्था करण्यास मोकळीक आहे, त्यापेक्षां कित्येक जण, तो आपल्या स्वतः-च्या मौजेकरितां खर्चणें हेंच पसंत करितील, हें उघड आहे. यद्यपि आपण पाहतों कीं, अशाहि पुरुषांच्या हातून गरीब आणि उद्योगी कुटुंबाचें सहज रक्षण केलें जातें, तथापि ते कमी आत्मस्वार्थी आहेत असें ह्मणतां येत नाहीं. परंतु असें आहे, तथापि त्याची चोरी करणें, अथवा त्याला ठकविणें, किंवा दुःख देणें, याविषयीं आपणास कमी प्रतिबंध आहे असें नाहीं. ख्रिस्तीशास्त्रांत असें सांगीतलें आहे कीं, "आपल्या शेजाऱ्याच्या व-

सूचा लोभ धरूं नये; तो तिचा चांगला उपयोग करितो ह्मणून धरूं नये असें नाहीं, परंतु ती त्याची आहे ह्मणून धरूं नये."

जेव्हां आत्मस्वार्थी आणि गर्विष्ठ असा एकादा श्रीमान् गृहस्थ तूं पाहातोस तेव्हां कदाचित् तुझ्या मनांत येत असेल कीं, आपल्यापाशीं जर त्याच्या इतकी संपत्ति असती तर तिचा आपण फार चांगला उपयोग केला असता. तूं करिशील अशी मला आशा आहे, परंतु तूं ज्या ठिकाणीं आहेस तेथेंच चांगल्या रीतीनें वागल्याशिवाय तूं दुसऱ्याच्या ठिकाणीं असतां, चांगल्या रीतीनें वागशील या विषयीं खात्री होणार नाहीं. ईश्वरानें प्रत्येक मनुष्यास निरनिराळे परीक्षा पाहाण्याचे प्रसंग व निरनिराळीं कर्तव्यकर्मे लावून दिलीं आहेत; आणि त्यानें ज्या स्थितींत तुला ठेविलें आहे त्याच स्थितींत तूं जें केलें असशील त्या प्रमाणें तो तुझा न्याय करील, दुसऱ्या कोणत्या स्थितींत असतां तूं अमुक केलें असतें असें तुला वाटतें त्याप्रमाणें करणार नाहीं.

---

# पाठ ८

## भांडवल

### प्रकरण १

आपणास ठाऊक आहे कीं, जो गृहस्थ आपल्या वार्षिक प्राप्तीमधून हजार किंवा दाहा हजार रुपये खर्च करितो. तो वास्तविक पाहातां सर्व देशाच्या संपत्तीमधून तितकें कमी करीत नाहीं: फक्त तो खातो, पितो, आणि वापरतो, तितकें मात्र काय तें कमी करितो; बाकीचें सर्व; जे त्यांचें काम करितात, अथवा जे त्याची चाकरी करितात, त्यांनां अन्नवस्त्र पुरविण्यांत, अथवा त्यांनां जें कांहीं पाहिजे असेल तें विकत घेऊन देण्यांत खर्च होतें: ह्मणून, जरी तो त्यांस रिकामें ठेवून हाल्लीं जें देतो तें फुकट देऊं लागला, तरीहि देशास त्यापासून अधिक फायदा नाहीं; ह्मणजे देशांतील अन्न अथवा वस्त्र हें वाढणार नाहीं; ते लोक मात्र आपली भाकर मिळवायाची ती न मिळवितां आळशी राहून कांहींएक करणार नाहींत.

परंतु ते निरुद्योगी बसतील त्यापेक्षां कामास लावलेले असले, तर अधिक सुखी होतील; मग तें काम कांहीं असो, फुलबाग करायाचा असो, अथवा धन्याच्या

करमणुकीकरितां माहाल बांधायाचा असो.

परंतु जेव्हां हा पैसा कांहीं फलदायक कामाकरितां मजूरांस खर्चिला असतो, ह्मणजे अशा एकाद्या कामांत खर्चितो कीं, त्यापासून खर्चापेक्षां प्राप्ति विशेष होते, तेव्हां, तेणेंकरून सर्व देशाची संपत्ति वाढत जाते. जसें, एकादा फुलबाग करण्याकरितां, अथवा रमणीय बंगला बांधण्याकरितां जो मजूरांस पैसा खर्चीयाचा, तो, जर धान्य उत्पन्न करण्याकरितां अथवा तें दळण्यासाठीं एकादी चक्की बांधण्याकरितां खर्चिला, आणि मोठ्या कौशल्यानें काम चालविलें, तर त्या धान्याची किंमत, किंवा जे लोक आपलें धान्य दळून नेतील त्यांनीं दिलेली दळणावळ, ही, जो पूर्वीं आपण खर्च केला आहे, त्यापेक्षां जास्ती होईल, आणि मग आपला पैसा आपणाजवळून अगदीं जायाचा (जसा एकादा फुलबाग करण्यांत किंवा रमणीय बंगला बांधण्यास खर्चिला ह्मणजे जातो) तो न जातां उलटा कांहीं वाढून परत येतो. ही जी वाढ तिला नफा ह्मणतात, आणि पूर्वीं खर्चिलेला जो पैसा त्याला भांडवल ह्मणतात.

अशा रीतीनें जो मनुष्य आपला पैसा खर्चितो, त्याणें तो परत येतांच पुनः नसेंच करावें, आणि

मजूरांस नेहमी आश्रय देत असावा. आणि असें एकादा वाढता शेतकरी किंवा कारखानदार करितो, त्याप्रमाणें प्रतिवर्षी आपल्या नफ्यांतून कांहीं शिलक ठेवून तें मुद्दलांत मिळविलें असतां, तो अधिकाधिक मजूर ठेवण्यास शक्तिमान् होतो, आणि मग त्यापासून सर्व देशाची संपत्ति वाढत जाते. यद्यपि तो आपल्या देशाविषयीं कांहीं एक काळजी बाळगीत नाहीं खरा, आपल्यास श्रीमंत करण्याकरितां मात्र यत्न करितो, तथापि आपल्या देशास मातबर करण्याचा चांगला आणि खरा असा हाच उपाय होय. कांकीं, देशांतील प्रत्येक मनुष्य, दुसऱ्याचा तोटा न करितां, जितकी आपली संपत्ति वाढवितो, तो वास्तविक पाहातां, तितकी सर्व देशाची संपत्ति वाढवितो असें होतें. एकादे वेळेस असें होतें कीं, एकजण मिळवितो, आणि तेणेंकरून दुसऱ्याचा तोटा होतो, तेव्हां मात्र खरोखरी देशाच्या संपत्तींत कांहीं वाढत नाहीं. जर एकादा मनुष्य जुगारानें किंवा भिक्षेनें, अगर चोरीनें श्रीमान् झाला, तर त्याणें मिळविलें तितकें इतरांपासून नाहींसें झालें; ह्मणून देशाच्या संपत्तींत कांहीं वाढलें नाहीं. परंतु जर त्याणें तें शेतकीमध्यें अथवा कांहीं दुसऱ्या कारखान्यांमध्यें, आपल्या हुशारीनें मिळविलें असेल तर त्यानें जितकें मि-

ळविलें, तितकी देशाची संपत्ति वाढली; कांकीं, तेणेंकरून दुसऱ्या कोणाचाहि तोटा झाला नाहीं.

पुष्कळ लोक अशा रीतीनें आपला पैसा लावितात; जरी स्वतः ते धंदा करीत नाहींत तरी जे करितात त्यांनां ते आपला पैसा उसनवारीनें देतात. मनांत आणा कीं, एक गृस्थ आहे त्याला त्याच्या बापानें एक हजार रुपये ठेविले आहेत, किंवा ते त्यानेंच आपल्या प्राप्तींतून सांचवून ठेविले आहेत. आतां ते कोणत्या रीतीनें व्यापारास लावावे, ह्मणजे त्यांपासून नफा होईल, हें त्यास ठाऊक नाहीं. तेव्हां जर त्याणें ते एका मजबूत पेटींत घालून आपल्या मुलाकरितां ठेविले तर ते जशाचे तसेच त्याच्या जन्मवर असतील; ह्मणून, त्याचीं मुलें पाहूं लागतील तेव्हां त्यांस मुळचे ठेविलेले तितकेच सांपडतील. अथवा जर तो प्रतिवर्षी खर्चाकरितां त्यांतून पन्नास रुपये काढीत गेला, तर वीस वर्षांच्या अंतीं ते सगळे नाहींसे होतील; या करितां, जर त्याणें ते एका उद्योगी मनुष्यास, परत देण्याविषयीं कांहीं तारण घेऊन उसने दिले, तर तो मनुष्य, रुपये वापरील त्याबद्दल प्रतिवर्षी चाळीस किंवा पन्नास रुपये देईल; त्याला व्याज असें ह्मणतात. जर त्या मनुष्याला असें ठाऊक असेल कीं, हे हजार रुपये आपल्यास वस्त्रें, मेजें, खुरच्या, किंवा दुसरा हरजि-

न्नस करण्याकरितां सामान विकत घेण्यास आणि काम कऱ्यांस पगार देण्यास उपयोगी पडतील, आणि तेणेंकरून आपण वर्षाअंतीं शें दीडशें रुपये नफा मिळवूं, तर तो असें करायास मोठ्या खुषीनें कबूल होईल; कांकीं, त्या नफ्यांतून व्याजाचे पन्नास रुपये जाऊन बाकी शें पन्नास रुपये त्याला राहातील.

या प्रमाणें, बहुत करून व्यापारांत किंवा कारखान्यांत जें भांडवल असतें, तें व्यापाऱ्याचें अथवा कारखानदाराचें स्वतःचें नसतें; त्याचे मालक निराळे असतात.

---

## प्रकरण २

कोणत्याहि देशामध्यें भांडवल जसजसें अधिक असतें तसतशी मजूरांची स्थिति बरी असते, कारण जसजसा धनी गरीब असतो, तसतसा मजूरांस चाकरीस लावायास आणि त्यांना मजूरी द्यावयास तो अधिक अशक्तिमान् होतो.

मनांत आण कीं, नवीन वसाहत झालेल्या एकाद्या देशांत तूं अगदीं गरीब आहेस, आतां तूं आपल्या शेजाऱ्यास आपलें शेत नांगरायाकरितां बोलाविलेंस, आणि त्याला सांगितलेंस कीं, तुझ्या मेहनतीबद्दल तुला त्या-

त्या उत्पन्नापैकीं कांहीं भाग मिळेल; तर तो ह्मणेल कीं, मला सद्यः कांहीं खावयास नाहीं, सबब तुला जर माझी गरज असेल, तर मला रोजच्या रोज मजुरी देत जा; परंतु जर तुजपासीं सरासरी तुझ्या गुजराणी पुरती मात्र सामग्री असेल, ह्मणजे तुजजवळ मांडवल नसेल, तर तुला सराई येई तों पर्यंत त्याला द्यावयास कांहीं मिळणार नाहीं; ह्मणून तुझी कांहीं जमीन ओसाड राहील; आणि त्या शेजाऱ्यास उपजीविकेकरितां अरण्यामध्यें जाऊन फळें मुळें शोधावीं लागतील, किंवा पारध करावी लागेल. आणखी खरोखरी कांहीं मनुष्यांस, मोठ्या फलद्रूप अशाहि जमीनीवर सामग्री शिवाय सोडिलें ह्मणजे, त्यांजवळ मांडवल नसल्यामुळें त्यांना आरंभीं वर सांगितल्याप्रमाणेंच करावें लागेल. त्यांला फार वेळ पर्यंत मोठ्या अडचणी येऊन पडतील; परंतु एकदां त्यांणीं कांहीं उपायानें थोडीशी संपत्ति केली, ह्मणजे आणखी अधिक मिळविण्यास त्यांला विशेष आयास पडणार नाहींत, कां, तर आपण अंमळ विचार करून पाहिलें, ह्मणजे लागलेंच आपल्या ध्यानांत येईल कीं, संपत्ति ही संपत्तीपासूनच प्राप्त होते; ह्मणजे मांडवलाच्या सहायानें संपत्ति मिळविता येते, त्याशिवाय मेहनत करितां येत नाहीं. धान्य हें मेहनतीनेंच उ-

सन्न होतें खरें; परंतु अगोदर पेरायास, आणि सरांई येई तों पर्यंत मजूरांस पोसायास धान्याचा संग्रह केला पाहिजे. कांम करायास जीं आउतें लागतात, तीं त्यांनींच केलीं आहेत. ज्या कुऱ्हाडीनें आपण लाकूड तोडितों तिचा दांडा हा लाकडाचाच आहे; तिचें लोखंड हें लोखंडी हत्यारांनींच खाणींतून खणून काढिलें आहे; आणि या प्रमाणेंच सर्व जातीच्या मेहनतीविषयीं जाणावें. यावरून उघड आपणास कल्पना करितां येईल कीं, आरंभीं मनुष्यास जेव्हां नुसत्या हातांनींच सर्व करावें लागलें असेल, किंवा जेव्हां त्याला तीक्ष्ण अशा खपरी, आणि बारीक टोंकाच्या फाटया यांशिवाय दुसरें कांहीं एक आऊत नव्हतें, तेव्हां त्याला आपली स्थिति सुधारायास पराकाष्ठेच्या अडचणी पडल्या असाव्या, व ती सुधारणा फारच सावकाशीनें चालली असावी.

यावरून, ज्या देशांत भांडवल नसतें, त्या देशांत राहाणारे जरीं थोडे असतात, व ते सर्व आपल्या उपजीविके करितां खपत असतात, तरीं त्यांना अन्नवस्त्र अथवा घर यांविषयीं सुभिक्ष देशांतील गरीब लोकांपेक्षांहि विपत्ति भोगाव्या लागतात; आणखी पुनः सभ्य देशांत वस्ती फार दाट असती, व तेथील सर्वच लोक आपल्या

पोटाकरितां हातानें मेहेनतहि करीत नाहींत.

शेतकरी, मजूरांस जी रोख मजूरी देतो तिला, व सामग्री वगैरे दुसरें जें कांहीं तो मजूर आणि नांगराचे बैल यांकरितां खर्चितो त्याला, अथवा कोष्टी, वस्त्रें विणण्याचा जो खर्च चालवितो त्याला, अस्थिर भांडवल असें ह्मणतात. कारण त्याजवळून तें वारंवार जातें, आणि शेवटीं धान्याचा, वस्त्राच्या अथवा दुसऱ्या कशाच्या रूपानें परत येतें. शेतकऱ्याचें कोठार, नांगर, गाडे, आणि बैल, तसेंच कोष्ट्याचा माग, वखार वगैरे याला स्थिर भांडवल असें ह्मणतात. कारण, तीं निरुपयोगी होत तोंपर्यंत त्याजवळून जात नाहींत. त्याच्याजवळ राहूनच त्याला नफा करितात.

परंतु पुनः एकादा शेतकरी फक्त विकाय्या करितांच जर बैल अथवा घोडे वाढवीत असेल, तर ते त्याचा अस्थिर भांडवलाचाच एक भाग होय.

व्यापारी, अथवा कारखानदार, नफा फार मिळवूं लागला, ह्मणजे तेणेंकरून त्याच्या मजूरांची मजूरी उतरते असें कित्येक मानितात, परंतु ही त्यांची चूक होय. वहुधा त्याच्या विपरीत अनुभवास येतें. जेव्हां कोणत्या एका जातीचा व्यापार नीट चालत नाहीं, तेव्हां त्या व्यापाऱ्यास आपला माल इतका सस्ता विकावा लागतो कीं,

त्याच्या माणसांस सरासरी निर्वाह करवेल इतकी मजूरी देऊनहि कामावर ठेववत नाहीं. ह्मणून नफा आणि मजूरी हीं दोनहि अगदीं उतरलीं असतात. आणि पुनः जेव्हां व्यापाराची चांगली भरभर असते तेव्हां व्यापारी पुष्कळ नफा मिळवितो, ह्मणून मोठमोठे पगार देऊन पुष्कळ मनुष्यें ठेवायास तयार असतो. आणि बहुधा अशा समयीं साधारण दरापेक्षां अधिक पगार देऊनहि चांगल्या हुशार मनुष्यास कामावर ठेवणें हितावह आहे असें आढळतें. ह्मणून उभयपक्षींहि मजूरी आणि नफा हीं दोनहि बरोबर असतात; ह्मणजे फार नफा मिळतो तेव्हां मजूरीहि फार असते, आणि नफा कमी मिळतो तेव्हां मजूरीहि कमी असते.

---

## प्रकरण ३.

जेणेंकरून पुष्कळ मनुष्यांचें काम थोडकीं मनुष्यें करूं शकतात असें एकादें आऊत अथवा यंत्र पहिल्यानेंच उपयोगांत आणिलें ह्मणजे, तेणेंकरून बहुत मनुष्यांचे धंदे बुडतात; परंतु परिणामीं त्याच्या योगानें धंदेहि पुष्कळांस लागतात, असें पाहाण्यांत येतें. उदाहरण. या देशांत छापण्याची युक्ति चालू झाली, तेव्हां पुष्क-

ळ लेखकांचीं पोटें बुडालीं, कारण, छापण्याच्या युक्तीनें थोडकीं मनुष्यें, हजारों लेखकांचें काम करूं लागलीं; परंतु आतां पुस्तकें इतकीं सस्तीं झालीं आहेत कीं, तीं घेण्यास पुष्कळ लोक शक्तिमान् झाले आहेत, आणि तेणेंकरून पूर्वीं जसे थोडकेसे लेखक लिहिण्यावर पोट भरीत असत, याप्रमाणेंच हल्लीं हजारों मनुष्यें छापखान्यावर पोट भरितात. या प्रमाणें कोणत्याहि जातीचें यंत्र पहिल्यानेंच उपयोगांत आणिलें ह्मणजे असें होतें.

भांडवलाचा उपयोग करण्याचा आणखी एक मार्ग आहे, त्याविषयीं लोक फार कुरकुर करितात, जसें काय तेणेंकरून त्यांचें नुकसानच होतें. परंतु, त्याशारिखा सर्व लोकांस अत्युपयोगी असा कोणताहि मार्ग नाहीं. जो मनुष्य धान्याचा अथवा दुसऱ्या कांहीं सामग्रीचा व्यापार करितो, तो नफा मिळविण्याकरितां, तें स्वस्तें असतें तेव्हां खरेदी करायास, आणि माहाग असेल तेव्हां विकायास, जपलेला असतो. आतां अविचारी लोक, जेव्हां माहागाई असते तेव्हां दाणेवाल्याच्या नावानें चडफडतात, आणि ह्मणतात कीं, हे या माहागाईचें कारण. परंतु वास्तविक पाहातां, जेव्हां पीक चांगलें येत नाहीं, तेव्हां आपणास मरणापासून तें था-

चवितात. दाणेवाल्यांचें, लोकांच्या कल्याणाकडे लक्ष नसतें; आपल्या भांडवलावर नफा मिळविण्याकडे मात्र त्याची दृष्टि असते; तथापि सस्ताई असेल तेव्हां खरेदी करणें, आणि माहागाई असेल तेव्हां विकरी करणें, असा जो नफा मिळविण्याकरितां तो मार्ग धरितो तो, आणि ज्या वर्षी पीक चांगलें आलें असेल त्या वर्षीचा गल्ला, ज्या वर्षी पीक चांगलें येणार नाहीं त्या वर्षाकरितां ठेवणें हा, हे दोनहि एकच होत. येणेंकरून प्रथमतः खर्च आणि मग दुष्काळ असें न होतां थोडा थोडा खर्च होऊन तो फार वेळ पर्यंत पुरतो.

गलबतावरील नाखुद्यास जेव्हां असें आढळतें कीं, आपली सामग्री (कल्पना कर कीं,) तीन आठवडे पर्यंत पुरेल, आणि मार्गांत आपणास चार आठवडे लागतील, तेव्हां खलाशांस ती थोड थोडी खर्चण्याविषयीं आज्ञा करितो; आणि त्या प्रमाणें प्रत्येकानें आपल्या नेहमीच्या अन्नाचे तीन चतुर्थांश घेतल्यानें तीच सामग्री शेवटपर्यंत पुरते; परंतु ते खलाशी जर कट करून त्या नाखुदावर उठून, आम्हांस नेहमी प्रमाणें पोटभर अन्न पाहिजे, असें ह्मणूं लागले तर त्या रीतीनें ती सामग्री तीन आठवड्यांत संपून जाईल, आणि मग

त्यांस उपाशीं मरावें लागेल. आतां हें उघड आहे कीं, जेव्हां पीक चांगलें येणार नाहीं, तेव्हां सर्व लोक नेहेमी प्रमाणेंच अन्न संपवूं लागले, तर त्यांची अवस्था वर सांगितल्या खलाशां-प्रमाणेंच होईल.

मनांत आणा कीं, एका वर्षीं ऋकवें पडून सौंऱ्यादेशांमध्यें नेहमी प्रमाणें खाल्लें असतां नऊ महिने पुरेल इतकें धान्य उत्पन्न झालें. आतां हें उघड आहे कीं, सर्व लोक नेहमीप्रमाणेंच अन्नाचा खर्च करितील तर शेवटल्या तीन महिन्यास कांहीं राहाणार नाहीं, आणि मग अर्थात भयंकर दुष्काळ पडेल.

धान्य जर स्वस्तें मिळालें, तर लोक सगळें संपे तोंपर्यंत नेहमी प्रमाणेंच खातील, तेव्हां याचा बंदोबस्त कसा होतो? गलबतासारिखा एथें कोणी नाखुदा नाहीं कीं त्यानें लोकांकडून थोडें खर्च करवावें. बरें असें ह्मणावें कीं, सर्वांच्या हिताकरितां सर्व लोक एका विचारानें कांहीं नियम करून त्याप्रमाणें चालतील, तर त्याविषयींहि फारशी आशा करायास नको; परंतु धान्याचा तोटा पडेल असा ऋमार दिसला, ह्मणजे शेतकरी, दाणेवाले, व आणखी दुसरेहि ज्यांजवळ भांडवल आहे ते, पुढें आपल्यास ज्याजती किंमत मिळेल ह्मणून जवळचें सर्व धान्य तसेंच संग्रहास

ठेवितात, आणि देशांतील अथवा परदेशांतील जें धान्य सांपडेल तें सर्व ते खरेदी करितात, आणि दाण्याची हाकाटी असेल त्या प्रमाणें अधिक अधिक किंमत घेऊन विकतात. आणि ह्या धान्याच्या माहागाईमुळें लोकांस तें फारजपून खर्चावें लागतें. या रीतीनें गलबता प्रमाणेंच सर्व देशामध्यें मोठ्या काटकसरीनें धान्याचा पुरावा होऊन दुसरें पीक येई पर्यंत लोकांची गुजराणी होते आणि कांहींशी अडचण सोसल्यानें दुष्काळापासून सर्व देशाचा बचाव होतो.

हा मोठा चमत्कार आहे कीं, मनुष्यें आपल्या हिताशिवाय दुसऱ्या कशाकडेहि लक्ष देत नसतां, ईश्वरानें कृपाळू होऊन मोठ्या चातुर्यानें या जगांत जी व्यवस्था केली आहे तिच्या योगानें त्यापासून सर्व लोकांचें मोठें हित होतें. आणि हें असें एका दाणेवाल्यापासूनच होतें असें नाहीं, सर्व साधारण असेंच होतें. लोकांस आपआपलें भांडवल, जसें हितावह वाटेल तसें योजायास मोकळीक असली; आणि जरी त्यांच्या मनांत आपआपलें मात्र हित करायाचें असलें, लोकांविषयीं कांहीं एक नसलें, तरीं त्यापासून बहुतकरून सर्वदा सर्व लोकांचें हित होतें.

# पाठ ९

## कर.

### प्रकरण १

खिस्ती शास्त्रांत सांगीतलें आहे कीं. जेव्हां यहुदी लोक बंदींतून मुक्त होऊन आपल्या शहराच्या भिंती पुनः बांधूं लागले, तेव्हां त्यांस शत्रूनीं इतकी पीडा केली कीं. त्यांना सतत हत्यारबंद राहून त्यांच्या पाहाऱ्यावर असावें लागत असें; आणि ते अकस्मात् हल्ला करितील, या भयानें प्रत्येक मनुष्य एका हातानें काम करी व दुसऱ्या हातांत शस्त्र घेऊन तयार असे. या प्रमाणें निदान एक मनुष्याचें काम करायास दोन मनुष्यें लागत. परंतु त्यांना जें संकट येऊन पडलें होतें, तेणेंकरून त्यांसहि अशी अडचण सोसावी लागली.

सांप्रतकाळींहि हा असा जुलूम एशिआ खंडाच्या पुष्कळ भागांत चालत आहे. तेथें लुटी करितां फिरणारे लुटारु लोक (मुख्यत्वें आरब) हे इतका त्रास देतात कीं, हातांत चांगलें संरक्षण करायाजोगें हत्यार असल्याशिवाय, या जुलुमापासून सुटण्याची कोणालाहि आशा नसते. अशा देशामध्यें मुशाफरी करणारे कित्येक लोक सांगतात कीं

एकादा कुळंबी शेत पेरायास निघाला,ह्मणजे बियांचें रक्षण करण्याकरितां हातांत तरवार अथवा भाला देऊन आपल्या सोबत्यांस बरोबर घेतो. अशानें जमीनीची लागवड होण्यास मनस्वी खर्च लागतो. कांकीं,एका मनुष्याचे कामास दोन मनुष्यें लागतात.एक काम करायास,आणि दुसरा भांडायास; आणि जें धान्य एकासच मिळालें असतें,तें दोघांस वांटून घ्यावें लागतें. इतकेंहि करून त्यांच्या मालमत्तेचें रक्षण होत नाहीं. लुटारु लोक जमून येतात,आणि रक्षण करणारांस मागें हटवून त्याउद्योगी लोकांच्या मेहेनतीचें जें फळ तें ते घेऊन जातात. अशा देशांत लागवड झालेली अशी जमीन थोडकीच असते. बहुतेक जमीन ओसाड असते. लोकांची वस्ती इतकी थोडकी असते कीं, त्या जमीनीच्यानें जेवढयांचें पोषण करवेल त्याच्या विसाव्या हिस्साहि नसते,व ते लोक अगदीं दरिद्री असतात. या सर्वांचें, मालमत्तेचें रक्षण नसणें,हेंच मुख्य कारण होय.

जेथील लोक अगदीं रानटी,अथवा कांहींसे सुधारलेले असतात, तेथें बहुतकरून असेंच असतें. रानटी मनुष्याचा बहुतेक वेळ, त्याची बहुतेक मेहेनत, आणि काळजी, ही त्याचें रक्षण करण्याकडे जातात. त्याजबरोबर त्याच्यानें भाडवेल त्यापासून रक्षणार्थ शस्त्रे मिळविण्यांत,

अथवा जे याजपेक्षां सुदृढ आणि बळकट आहेत, त्यांपासून आपला बचाव करण्याकरितां आश्रयस्थान शोधण्यांत बहुतकरून तो गुंतलेला असतो. न्युझीलंड, या बेटांतील कित्येक कुटुंबें एकत्र जमून एकाद्या उंच कड्याच्या शिखरावर आपल्या लहानशा झोंपड्या बांधितात, आणि शेजारच्या खेड्यांतील लोकांपासून आपलें रक्षण करण्याकरितां आपल्या खोपटांसभोंवती खाडे खणून ठेवितात; अथवा बारीक सुळक्यांचे मोखे पुरून ठेवितात. इतकेंहि करून वारंवार त्यांचे शत्रु त्यांजवर चढाव करून त्यांस पराजित करून टाकितात. युरोपांतील कोणत्याहि भागांत तेथील वस्तीच्या प्रमाणानें, वर्षास जे लोक मारले जातात. त्यांच्या शंभरपट अशा देशांत मारले जातात. आतां त्यांजवळ कांहींच नसतें, सबब मालमत्तेचा थोडकाच नाश होतो. ते लोक अगदींच गरीब असतात. कां कीं, एक तर त्यांचा निमे वेळ आणि श्रम हे आपलें रक्षण करण्यांत जातात, आणि दुसरें तें रक्षणहि अर्धवट होतें, ह्मणून त्यांच्या उद्योगाचें जें फळ तें त्यांस सुरक्षितपणें प्राप्त होत नाहीं.

ह्या अशा दुःखकारक स्थितीपासून सुटण्याचा उपाय ह्मटला ह्मणजे त्याला चांगलें सरकार असलें पाहिजे. कोणत्याहि सरकारचें, रक्षण करणें ह्मणजे लोकांचा जीव

आणि जिनगी, यांचा जुलुमापासून बचाव करणें, हें मुख्य काम होय. हें कांम करण्याकरितां, तें गलबतें आणि शिपाई बाळगून त्यांजकरवीं परशत्रु, चांचे, दरवडेखोर अथवा बंडखोर, यांचा पाहारा करवितें; तसेंच अपराध्यांस पकडण्याकरितां फोजदार वगैरे यांस नेमितें; न्याय करण्याकरितां न्यायाधीश वगैरे यांची योजना करितें; अपराध्यांस बंदींत ठेवण्याकरितां तुरुंग बांधितें, सारांश लोकांमध्यें स्वस्थता राहावी आणि त्यांचें रक्षण व्हावें ह्मणून जें काय पाहिजे तें सर्व करितें.

फोजेचा, आरमाराचा, अथवा जें कांहीं सरकार करतें, त्या सर्वांचा खर्च लोक देतात, आणि हें सर्व लोकांच्या हिताकरितां आहे, ह्मणून त्यांनी द्यावा हें फार चांगलें. आपण कर, पट्ट्या, वगैरे जें देतों तें, याकरितांच; सरकार, लोकांवर अधिकार चालवितें, आणि त्यांचें रक्षण करितें, त्याचें, कर हें भाडें, अथवा किंमत होय. वर सांगीतलेल्या कित्येक देशांमध्यें, शेतकरी, चोरांपासून आपलें रक्षण करण्याकरितां भालेवाला अथवा तरवारवाला, बरोबर घेऊन जातो, त्याला जशी तो मजूरी देतो, त्याप्रमाणेंच सरकारास आपण कर देतों.

हें कित्येक लोकांच्या ध्यानांत येत नाहीं, किंवा ते

लक्षांत ठेवित नाहींत. पुष्कळ लोक असें ह्मणतात कीं, करांचा खर्च हा इतर सर्व खर्चाहून कांहीं निराळ्या प्रकारचाच आहे. करांच्या मोबदला ते कांहीं तरी घेतात, हें त्यास ठाऊक नसेल, अथवा ते विसरत असतील. वास्तविक पाहातां, कर देणें ही शुद्ध अदलाबदली होय. आपण भडभुंजास, अथवा खाणावळ घालणाऱ्यास, आपल्या जेवणा करितां पैसा देतों; शिंप्यास आपल्या पांघरुणाकरितां देतों; तसेंच लूट, घात, अथवा लबाडी, यांपासून आपलें रक्षण करण्याकरितां राजास कर देतों. या गोष्टीकरितां, आपला अर्धा वेळ अन्नवस्त्र मिळविण्यांत, आणि अर्धा वेळ त्यांपासून आपलें रक्षण करण्यांत, अथवा ज्याला आपल्या करितां पाहारा करायास आणि भांडायास बोलावूं त्याच्या साठीं काम करण्यांत गेला नसता काय? आपण कर देतों या पेक्षां हें आपणास फार जड गेलें असतें; आणि तेणेंकरून आपलें रक्षणहि चांगलें झालें नसतें, हें रानटी लोकांच्या उदाहरणावरून स्पष्ट आहे. मुळीं सरकारच नसणें, त्या पेक्षां तें अगदीं वाईट असलें तरी चांगलें. रोम एथील कित्येक बादशाह हे इतके पराकाष्ठेचे जुलुमी होते कीं, त्यांणीं केवळ निरपराधी अशा पुष्कळ लोकास लुटून ठार मारिलें; तथापि, त्यांच्या राज्यांतहि प्रजेच्या संख्ये

ऱ्या प्रमाणानें पाहिलें तर, दहा वर्षांत जितके लोक लुटिले अथवा मारिले असतील, त्यांपेक्षां एका वर्षांमध्यें, इंग्लंड एथें अथवा दुसऱ्या कित्येक रानटी देशांत अधिक मारिले जातात.

## प्रकरण २

आतां वर सांगीतल्यावरून हें स्पष्ट आहे कीं, जसें एकाद्या वस्तूबद्दल आपण तिची किंमत देतों, त्या प्रमाणेंच आपल्या रक्षणाबद्दल सरकारास कर ह्मणून त्याचें भाडें अथवा किंमत देतों.

असें आहे तथापि या दोहोंमध्यें कांहीं अंतर आहे; एकाद्या वस्तूबद्दल आपण जें कांहीं देतों तें आपल्या इच्छेवर असतें; परंतु कर देणें हें सर्वांस जरूर पडलें आहे. जर चांभारापासून जोडे विकत घ्यावयाचे नाहींत, आपण ते घरीं करूं, अथवा अनवाणींच चालूं असें ह्मटलें, तर तसें करायास मोकळीक आहे. आणि या प्रमाणेंच अशा प्रकारच्या देण्याविषयींहि मोकळीक आहे. परंतु कर देण्याविषयीं तसें नाहीं. जर कोणी असें ह्मणेल कीं, "मी माझ्या जीवाचें आणि जिंदगीचें रक्षण, शिपाई, फौजदार, अथवा न्यायाधीश, यांतून कोणाचीहि मदत घेतल्याशिवाय करीन."

तर त्याला असें उत्तर मिळेल कीं, "अमेरिकेंतील जंगलामध्यें अथवा तशाच दुसऱ्या एकाद्या देशांत जाऊन राहा; किंवा रानटी लोकांत जाऊन राहा, आणि ते करतात तसें कर म्हणजे झालें; तूं जों पर्यंत, सरकार आहे अशा देशांत आह्मांबरोबर आहेस, तों पर्यंत, तुझी इच्छा असली तरीहि, सरकारच्या रक्षणाचा विभागी होणें तुझ्यानें नकारवत नाहीं. परशत्रूपासून देशाचें रक्षण करितात अशीं जीं लष्कर आणि आरमार तीं, जशीं आमचीं रक्षक आहेत, तशींच तुझीं हि आहेत; कायदे आणि न्यायखात्यांतील कामदार, यांच्या द्वारें चोर आणि घातकी यांपासून आमचें तसेंच तुझेंहि रक्षण होतें; जर हे नसते तर त्यांणीं, लोकांमध्यें धुंदाई मांडिली असती. या कारणास्तव, सरकारास इच्छा असो अगर नसो, त्याला तुझें रक्षण केलें पाहिजे, आणि तुलाहि त्याच्या खर्चाचा, तुझ्या वांटणीचा हिसा दिला पाहिजे, मग तुझी इच्छा असो अगर नसो. इतकेंहि असून जर तूं मूर्ख असलास, आणि हा सरकाराशीं केलेला व्यवहार तुला आवडत नसला, तर देशत्याग करून भलत्या एकाद्या रानांत जाऊन राहा म्हणजे झालें."

ही एक फार चांगली गोष्ट आहे कीं, जों पर्यंत, कोणी मनुष्य एकाद्या देशांत राहात आहे, तों पर्यंत, त्याला

त्या देशाच्या सरकारास नमून असायाचें आणि कर याव- याचें जरूर आहे. आतां प्रत्येकानें काय काय द्यावें हें ठरव- णें सरकाराकडे आहे, ह्मणून ही आणि दुसऱ्या सर्व प्रकार- ची अदलाबदली यांत आणखी मोठें अंतर आहे. जेव्हां आ- पण एकाद्या माणसास आपलें काम करायास मजूर बोला- वितों, तेव्हां त्याच्याशीं आपल्या इच्छेप्रमाणें ठराव करितों, आणि त्याचें आपलें न जुगलें तर आपण दुसऱ्यास बोला- वितों; परंतु कोणत्याहि देशाचें सरकार ह्मटलें ह्मणजे (मग तें राजा असो, अध्यक्ष असो, पार्लमेंट असो अथवा दुसऱ्या कोणत्याहि प्रकारचें असो) त्याला सर्व लोकांस आपल्या अमलांत आणण्याचें सामर्थ्य असलें पाहिजे; कांकीं अ- सें नसेल तर रक्षण करणें हें जें त्याचें कांम, तें त्याच्या हा- तून होणार नाहीं. या कारणासाठीं, प्रत्येकानें आपल्या रक्ष- णाकरितां काय द्यावें, हें ठरविण्याचें त्याच्या इच्छेवर ठेवि- लें नाहीं. अमुक कर द्यावा असें सरकार ठरवितें आणि तो देण्याविषयीं लोकांवर सक्ति करितें.

पुष्कळ सरकारांनीं ह्या आपल्या सत्तेचा सदुपयोग करण्याचें सोडून आपल्या प्रजेवर, देशाचें रक्षण करण्या- स आणि त्याला आपल्या अधिकाराखालीं ठेवण्यास जो वास्तविक खर्च लागायाचा त्यापेक्षां अतिशय ज्यास्त दे-

ण्याविषयीं सक्ति केली आहे. इंग्लंडामध्यें (व आणखीहि कित्येक देशांत) या अनर्थापासून सुटण्याकरितां सर्व लोकांतून कित्येकांस त्यांच्या इच्छेप्रमाणें अधिकारी नेमलेले आहेत, म्हणजे तेथील पार्लमेंट म्हणून जी राज्यकारभार चालविणारी सभा आहे, तिचे सभासद सर्व लोकांच्या इच्छेप्रमाणें नेमिले आहेत, त्यांच्या संमताशिवाय कोणताहि कायदा व्हावयाचा नाहीं, अथवा कोणत्याहि प्रकारचा कर बसविला जात नाहीं.

कर हा सर्व लोकांचा पैसा आहे म्हणून तो गैरशिस्तरीतीनें खर्चूं नये, आणि जें आवश्यक आहे, त्याजपेक्षां आपणास अधिक द्यावें लागूं नये, म्हणून त्याविषयीं चौकशी करणें हें फार चांगलें आहे. परंतु हें फार वाईट आहे कीं कित्येक लोक, सरकार आपलें रक्षण करितें त्यापासून आपलें जें हित होतें, त्याकरितां आपणास सरकारचे जितके आभारी झालें पाहिजे तितके होत नाहींत; कांकीं ज्यांवर सरकार नाहीं त्यांची ती भयंकर स्थिति त्यांना माहित नाहीं अथवा ते तिजविषयीं विचार करीत नाहींत. ज्या ज्या वस्तूंकरितां कांहीं द्यावें लागतें, त्यांतील कोणत्याहि एकादीची, तिला मिळवण्याचे खर्चाशीं तुलना करून पाहिली तर आपण सरकारापासून जें रक्षण घेतों त्यासारखी सस्ती अ-

शी दुसरी कोणतीहि वस्तु नाहीं. जर आपण वस्त्रें, जोडे, हीं कोष्टी, चांभार, यांपासून विकत घेतलीं नाहींत, आणि घरीं केलीं, तर तीं आतांपेक्षां खरोखर फार वाईट होतील, आणि खर्चहि फार लागेल; परंतु जर आपल्यांतून प्रत्येकाकडे त्याच्या जिवाचें आणि जिंदगीचें रक्षण करण्याचें असेल, तर तें याहिपेक्षां पराकाष्ठेचेंच वाईट होईल. अशा रीतीनें तो आपलें रक्षण करील तें अगदीं थोड्या किमतीचें असून त्याला मनस्वी खर्च लागेल.

---

## प्रकरण २

इंग्रेज लोक आपल्या राजास जे कर देतात ते चालत्या वर्षाच्याच खर्चांत जातात असें नाहीं, तर त्यांचा बहुतेक भाग गेल्या वर्षांच्या खर्चांत जातो; ह्मणजे सरकारानें लोकांचें जें कर्ज घेतलें आहे, त्याच्या व्याजांत जातो. मागें त्यांणीं ज्या मोठमोठ्या आणि खर्चाच्या लढाया केल्या, त्यांमध्यें दरवर्षाच्या करांच्या उत्पन्नापेक्षां खर्च फार झाला, ह्मणून सरकारानें मालबर लोकांपासून कर्ज घेऊन तें फिटेपर्यंत व्याज देण्याचें कबूल केलें आहे, परंतु बहुतेक कर्ज अद्याप तसेंच आहे, व तें कदाचित् पुढेंहि फिटणार नाहीं, ह्मणून कर्ज देणारास त्याबद्दल वर्षासनें (ह्मणजे सरका

रानें वसूल केलेल्या करांतून अमुक एक रकम घेण्याविषयींचा हक्क ) मिळालीं आहेत, आणि हीं वर्षासनें, ज्यांना सरकारी तारणें अथवा फंडांतील मिळकत असें ह्मणतात, तीं इतर जिंदगीप्रमाणेंच एकापासून दुसऱ्यास विकतां येतात. अथवा वांटून त्यांचे विभाग करून घेतां येतात. जेव्हां एकाद्या गरीब मनुष्याजवळ कांहीं ऐवज सांचतो तेव्हां तो बहुत करून फंडांत ठेवितो अथवा एकाद्या पेढीवर ठेवितो, मग ती पेढी तो ऐवज फंडांत ठेविते; अशा रीतीनें तो गरीब मनुष्य सरकारचा एक घेणेदार होतो आणि मग करांचा उत्पन्नांतून त्यालाहि त्याचा हिसा मिळूं लागतो. यावरून पाहा कीं, जर कांहीं दिल्याशिवाय कायद्यानें हें लोकांचें सर्व देणें नाहींसें करून टाकिलें, तर मोलमजुरांसुद्धां पुष्कळ लोकांचें सर्वस्व जाईल. आणि अशानें देशावरचें कर्जाचें ओझें कमी होईल असें नाहीं; कांकीं हें शब्द कित्येक इंग्रेजांच्या हिताकरितां दुसऱ्या कित्येकांस बुचाडले असें होईल.

जी दारू जळून गेली व जीं शिपायांनीं उगलीं घातलीं, आणि तारवें जीर्ण होऊन गेलीं, त्यांकरितां इतका पैसा खर्च झाला ही मोठी दुःखकारक गोष्ट आहे; परंतु त्याविषयीं आतां विचार करून उपयोग नाहीं. खर्च तर होऊन चुकला. परंतु उसनवारीनें घेतलेल्या पैशाचें व्याज देण्या-

करितां जे कर वसूल करितात, ते मात्र सर्व देशास नाहींसे होत नाहींत; शुद्ध एकापासून घेऊन दुसऱ्यास दिले असें होतें. तें व्याज देण्यास सर्व इंग्रेज लोक करांच्या रूपानें मदत करीतात; आणि त्यांतून सर्व सरकारच्या घेणेदारांस ह्मणजे ज्यांचा पैसा फंडांत आहे अथवा पेढीवर आहे त्यांस त्यांच्या त्यांच्या हिशाप्रमाणें शुद्ध कर्जासारिखेंच मिळतें. याप्रमाणें इंग्रेज लोक जे कर देतात ते, ज्यांस कांहीं आशा नसते, अशा पुष्कळ गरीब लोकांच्या घरीं पुनः परत येतात.

वर सांगीतलें आहे कीं कराचा बहुतेक भाग या कार्याकरितांच वसूल करितात; ह्मणजे लोकांच्या कर्जाचें व्याज वारण्याकरितां वसूल करितात. हें खालीं लिहिलेल्या हिशेबावरून उघड ध्यानांत येईल. करांच्या वसुलाच्या दर दशकाची या प्रमाणें व्यवस्था होती.

| | रु. | आ. | पै. |
|---|---|---|---|
| लष्कराचा आणि आरमाराचा खर्च.......... | २ | ९ | ४ |
| राजा, न्यायाधिश, प्रधान, आणि दुसरे सरकारी कामगार, यांचीं वेतनें तसींच पेनशनें द्द०..... | ० | ६ | ८ |
| आणि लोकांच्या कर्जाचें व्याज | ६ | ० | ० |
| | १० | ० | ० |

## पाठ १०

## भाड्यानें देणें आणि भाड्यानें करणें.

### प्रकरण १

जेव्हां कोणी मनुष्य आपली वस्तू दुसऱ्यास अगदीं देतो आणि ती बद्दल पैसा घेतो तेव्हां त्या कृत्याला क्रयविक्रय असें ह्मणतात. जेव्हां तो ती कांहीं वेळ पर्यंत मात्र देतो (ह्मणजे भाड्यानें देतो) आणि त्या बद्दल पैसा घेतो तेव्हां त्या कृत्यास भाड्यानें देणें आणि भाड्यानें करणें असें ह्मणतात.

परंतु अशा जातीचे व्यापारसूचक अनेक शब्द आहेत. जेव्हां कोणी कांहीं किंमत घेऊन दुसऱ्यास आपली गाडी, घोडा, अथवा दुसरें कांहीं वापरायास मोकळीक देतो, तेव्हां त्या किंमतीस भाडें असें ह्मणतात. तसेंच जेव्हां तो आपल्या स्वतांस भाड्यानें देतो ह्मणजे आपली चाकरी करण्याची अथवा आपलें काम करण्याची मेहेनत भाड्यानें देतो, तेव्हां त्याला जो आपण पैसा देतों त्यालाहि भाडें (सर्वसाधारण मजूरी) असें ह्मणतों. परंतु गाडी, घोडा यांच्या ठिकाणीं त्याणें आपलें घर किंवा बाग भाड्यानें दिला, तर त्याबद्दल त्याला जें मिळतें त्याला स्वामित्व अथवा केव्हां केव्हां भाडेंहि ह्मणतात. आणि त्याणें जर आपला पैसा वापरायास

दिला तर त्या बद्दल त्याला जें आपण देतों, त्याला व्याज ह्मणतात. आतां यद्यपि ह्या साऱ्या शब्दांचा या रीतीनें उपयोग करितात, तथापि हे इतक्या प्रकारचीं निरनिराळीं कृत्यें दाखवितात असें नाहीं. स्वामित्व, भाडें, आणि व्याज, या शब्दांच्या अर्थाविषयीं आपण जर सूक्ष्म दृष्टीनें विचार केला तर हे सारे शब्द एकाच जातीच्या देण्याचे वाचक आहेत. निरनिराळ्या वस्तू जेव्हां भाड्यानें दिलेल्या असतात, तेव्हां निरनिराळ्या शब्दांचा उपयोग करणें ही एक बोलण्याची रूढी आहे.

मूसा याच्या कायद्यामध्यें आपल्या बंधुवर्गास व्याजीं पैसा देण्याविषयीं इस्राएल लोकांस प्रतिबंध केला होता. कारण कीं, त्यांनीं आपल्या जमीनीच्या उत्पन्नावर निर्वाह करावा, व्यापार करूं नये. असा त्याचा हेतु होता. ह्मणून त्यांमध्यें पैशाची फारशी उलाढाल करण्याचा प्रसंग आला नव्हता, व उसना पैसा घेण्याचाहि प्रसंग क्वचित्च पडला; कदाचित् त्यांतून कोणी एकादा विपत्तींत पडला तर एकाच कुटुंबांतील मनुष्यें जसीं परस्परांस स्नेहानें व ममतेनें सहाय करितात तसें त्यांनींही करावें असें होतें. कारण कीं, इस्राएल लोक हे जाकोबाच्या (याला इस्राएल असेंहि ह्मणत, आणि त्यावरूनच त्यांनीं

इस्राएल हें नाम धारण केलें) बारा मुलांची संतति होती आ-णि त्यांस अशी आज्ञा होती कीं त्यांणीं परस्परांस बंधू प्रमाणें मानावें.

परंतु देवाच्या कायद्यानें इस्राएल लोकांशिवाय दुसऱ्या कोणाहि परक्यापासून व्याज घेण्यास त्यांस मोकळीक होती. यावरून असें दिसतें, कीं व्याज अथवा दुसऱ्या कोणत्याहि प्रकारचें भाडें घेण्यांत कांहीं वाईट नाहीं. कारण कीं, कायद्यामध्यें उघडपणें त्यांस अशी आज्ञा आहे कीं, त्यांणीं परक्याचें वाईट करूं नये अथवा त्यांजवर जुलूम करूं नये, आणि त्यांशीं खरेपणानें वागावें इतकेंच नाहीं परंतु ममतेनें आणि दयेनें वागावें.

वर सांगितल्यावरून उघड आहे कीं, पैसा वापरायास घेतला असतां त्याकरितां जें द्यावयाचें त्यांत, आणि दुसऱ्या एकाद्या वस्तूकरितां जें द्यावयाचें त्यांत, वास्तविक पाहातां कांहीं अंतर नाहीं. कारण, मनांत आण कीं, आपणांजवळ शंभर रुपये आहेत. आतां हें सहज ध्यानांत येईल कीं, त्यांचें आपण एक घर घेतलें किंवा जमीन घेतली, आणि अमूक रुपये दरसाल प्रमाणें तीं दुसऱ्याला भाड्यानें दिलीं अथवा ते रुपये एकाद्याला घर किंवा जमीन खरेदी करायास दिले, आणि त्यापासून अमूक रुपये दरसा-

ल प्रमाणें व्याज घेतलें, तरी दोनहि सारिखींच; वास्तविक अंतर कांहीं नाहीं. परंतु पहिल्या प्रकारानें जें मिळतें, त्याला भाडें ह्मणतात, आणि दुसऱ्यानें जें मिळतें, त्याला व्याज ह्मणतात.

---

## प्रकरण २.

प्रत्येक मनुष्यास घर अथवा जमीन अथवा जें दुसरें कांहीं त्याचें ह्मणून असेल, तें पाहिजे त्या रीतीनें विकण्यास अथवा भाड्यानें देण्यास अथवा वापरण्यास मोकळीक असावी हें फार चांगलें. पृथ्वीमध्यें असे कित्येक देश आहेत कीं, तेथें तार्तार लोकांप्रमाणें अर्धवट सुधारलेल्या लोकांची वस्ती आहे; तेथें जमीनीवर कोणा एका पुरुषाची सत्ता नसते, परंतु सामान्यतः सर्व लोकांची असते, ह्मणून पाहिजे तो आपलीं गुरें चरावयास नेतो. आणि ह्मणूनच हे लोक आपल्या आयुष्यभर भटकत फिरत असतात. तंबूमध्यें राहातात, आणि गुरांकरितां चांगल्या कुरणाचा शोध करित, ह्या जाग्यावरून त्या जाग्यावर असे नाचत असतात. आणि यावरून उघड ध्यानांत येईल कीं, तेथें जमीनीची लागवड मुळींच होत नाहीं. कां कीं, दुसरा येऊन शेत कापून नेईल, ह्मणून शेताची लागवड करावी असें को

णास वाटत नाहीं.

आणखी कित्येक असे देश आहेत कीं, तेथें कोणी मनुष्यानें ज्या जमीनीची लागवड केली असेल, ती जमीन, धान्य कापून घेई पर्यंत आपल्या सत्तेंत ठेवावी; आपलें धान्य कापून घेतांच तिजवरून त्याची मालकी नाहींशी होती. मग पाहिजे त्याला ती आपल्या ताब्यांत घेण्यास मोकळीक आहे. अशी ही चाल सांप्रत काळीं आरबस्थानाच्या कित्येक प्रांतीं आहे, आणि क्यानन देशांत जेव्हां आब्राहाम व ऐझाक हे राहात होते तेव्हां तेथेंहि अशी चाल होती असें दिसतें.*

परंतु अशी स्थिति असतां, शेताची बंदीस्ती करण्याकरितां अथवा खत घालण्याकरितां आपला पैसा खर्च करावा, हें कोणालाहि चांगलें वाटत नाहीं. कां कीं आपण दुखण्यांत पडलों आणि तेणेंकरून आपलें शेत लावायाचें बंद पडलें, अथवा आपण मेलों आणि आपलीं मुलें लहान असलीं, तर तें शेत आपणाकडे राहाणार नाहीं; दुसरे बळकावून बसतील, आणि आपण खर्चिलेला पैसा फुकट जाईल, असें त्यांस वाटतें.

ह्मणून, जमीनीची चांगली लागवड होण्याकरि-

* जेनिसीस अ० २६ औ० १२, आणि प्रे० क० ५–५

तां ती खासगी माल असली पाहिजे, सर्वांची असून उपयोगी नाहीं; आणि कांहीं जमीन आपली असली, ह्मणजे तिची दुसऱ्या कोणत्याहि मालाप्रमाणें व्यवस्था करण्याची मोकळीक असली पाहिजे; मग ती विकण्यास, अथवा घरी लावायास, अथवा कोणी एकादा खटपट्या ठेवून त्याजकडून मजुरांकरवीं तिची लागवड करायास, अथवा दुसऱ्या कोणा शेतकऱ्यास मक्त्यानें द्यावयास मोकळीक असली पाहिजे.

कोणत्या एकाद्या देशांत, लोकांच्या संख्येच्या प्रमाणानें जमीनीची कमताई असली, ह्मणजे ज्याला भाडें अथवा स्वामित्व असें ह्मणतात, व जें शेतकरी अथवा दुसरा कोणी ती जमीन वापरण्याबद्दल देतो, तें फार असतें. याचें कारण पाहूं गेलें तर अगदीं सरळ, आणि समजायास सोपें आहे. जशी इतर पदार्थांची किंमत गिऱ्हाइकांच्या संख्येच्या प्रमाणानें त्या पदार्थांची कमताई असली ह्मणजे वाढते, त्याप्रमाणेंच जमीनीची किंमत, अथवा भाडें, हेंहि वाढतें. जेव्हां घोडे पुष्कळ लोकांस पाहिजे असतात, व ज्यांच्यानें घेववतील असे पुष्कळ लोक असतील आणि त्यांच्या संख्येच्या प्रमाणानें पाहिलें असतां घोड्यांची कमताई असली, तेव्हां त्यांची किंमत अथवा भाडें,

हें ज्यास्त होतें. याप्रमाणेंच सर्व वस्तूविषयीं जाणावें व तसें-च जमीनीविषयीं हि जाणावें. शेतकऱ्यास जमीन पाहिजे असते, कांकीं तिजमध्यें धान्य अथवा दुसरें कांहीं पिकवून त्यापासून त्याला नफा मिळविण्याची आशा असते; आणि तो त्याकरितां स्वामित्व देण्यासहि कबूल असतो, कांकीं, ती फुकट मिळत नाहीं. आणि याप्रमाणेंच जें कांहीं आपण विकत घेतों, अथवा भाड्यानें घेतों त्याविषयीं समजावें. जेव्हां एकादी वस्तु आपणास पाहिजे असते, तेव्हां ती केवढ्यास घेणें योग्य आहे हें आपण पाहातों; आणि ती तेवढें दिल्यावांचून मिळत नसली, ह्मणजे मग तें आपण देण्यास राजी होतों.

जमीनीपासून पीक उत्पन्न होतें ह्मणून ती पाहिजे असते, आणि स्वामित्व दिल्यावांचून ती मिळत नाहीं, ह्मणून स्वामित्व देऊन ती घेतात. मारवाडांतील वाळवंटामध्यें पाहिजे तर फुकट हि जमीन मिळेल; परंतु तिची कोणाला हि इच्छा नाहीं, कांकीं, तेथें कांहीं उत्पन्न होत नाहीं. परंतु पुनः अमेरिकेच्या पुष्कळ भागीं जंगली जमीन, जरी ती चांगली व पिकाऊ आहे तरी हि फुकट मिळेल. तेथें जमीन इतकी पुष्कळ आहे, व लोकांची वस्ती इतकी थोडी आहे कीं, पाहिजे त्याणें हवी तेवढी जमीन साफ *

रावी, आणि घ्यावी. या देशामध्यें जी पिकाऊ जमीन आहे तिला मूल्य आहे, कांकीं तिचा पुरावा कमी आहे. अमेरिकेच्या जंगलामध्यें जमीनीला कांहीं मूल्य नाहीं; जिजमध्यें (मारवाडांतील वाळवंटाप्रमाणें) कांहीं पिकणार नाहीं ह्मणून नाहीं असें नाहीं; परंतु जरी ती चांगली सफल आहे, तथापि इतकी पुष्कळ आहे कीं, एकेकास पाहिजे तितकी सांपडून आणखी पुष्कळ अधिक आहे, ह्मणून तिला कांहीं मूल्य नाहीं. परंतु अमेरिकेंतहि नवीन वसाहत झालेल्या ठिकाणीं, झाडें झुडें तोडून जमीन चांगली साफ केली, व जवळपास चांगले रस्ते झाले, ह्मणजे लागलीच ती मूल्यवान् होते. लोकांस अरण्यामध्यें जमीन फुकट मिळत असतांहि ते अशा प्रकारची जमीन विकत घेण्यास अथवा भाड्यानें घेण्यास फार उत्सुक असतात. कांकीं, जंगलामध्यें ह्मटलें ह्मणजे अगोदर त्यांनां झाडें तोडून जमीन साफ केली पाहिजे; नंतर जो काय जिन्नस पाहिजे असेल तो विकत घेण्यास, आणि पिकलेलें धान्य विकावयास बाजारांत जाण्याकरितां, कदाचित् शेंपन्नास कोस जावें लागेल.

जशी लोकांच्या संख्येच्या प्रमाणानें जमीनीची कमताई होत जाती, ह्मणजे कोणत्या एकाद्या देशांत ज-

शी लोकांची संख्या वाढत जाते, त्या प्रमाणें जमीनीच्या मालकांस अधिक अधिक स्वामित्व मिळेल अशी त्यांची खात्री होती. असें कां होतें हें, मी पूर्वी स्पष्ट करून दाखविलेंच आहे कीं, जी वस्तु कांहीं उपयोगाची आहे, तिची कमताई असली, म्हणजे ती मूल्यवान् होते ( म्हणजे तिजपासून कांहीं किंमत उत्पन्न होती ) यावरून ध्यानांत येईल.

कित्येकांस असें वाटतें कीं, जमीनीपासून उत्पन्न होणारे जे अन्न आदिकरून पदार्थ, ते मनुष्याच्या जीवनास आवश्यक आहेत, सबब जमीनीला स्वामीत्व आहे. परंतु ते असा विचार करीत नाहींत कीं, हवा अन्नासारिखीच आवश्यक असून आपणास कांहीं दिल्यावांचून मिळते, व जी वस्तू कांहीं दिल्यावांचून मिळते, तिजकरितां कांहीं देऊन कोणीहि घेणार नाहीं. अमेरिकेंतील रानामध्यें जशी चांगली जमीन पुष्कळ आहे, तशी, लोकांच्या संख्येच्या प्रमाणानें जर एथेंहि असती, तर पाहिजे तो हवी तेवढी जमीन फुकट घेता. जरीं त्याला लागवडीच्या मेहनतीशिवाय दुसरें कांहीं पडतें ना, तथापि धान्य वगैरे आवश्यक पदार्थ आतां उत्पन्न होतात तसेच तेव्हांहि झाले असते. ज्या जमीनीमध्यें कांहीं उत्पन्न होत नाहीं, व जी अगदीं कांहीं उपयोगाची नाहीं,

तिजकरितां मात्र कोणीहि स्वामित्व देणार नाहीं. जमीनीची अथवा दुसऱ्या कोणत्याहि पदार्थाची कितीहि कमताई असो; परंतु जो अगदीं निरुपयोगी आहे, त्याबद्दल कोणीहि कांहीं देणार नाहीं; आणि ती कितीहि उपयोगी असो, परंतु जर ती इतकी पुष्कळ आहे कीं, कांहीं दिल्यावांचून मिळते. तर तिला कोणी कांहीं देणार नाहीं. मागील एका पाठांत सांगीतलेंच आहे कीं, कोणताहि पदार्थ नुसत्या कमताईनेंच मूल्यास चढत नाहीं, किंवा नुसता तो उपयोगी असल्यानेंहि चढत नाहीं, परंतु तीं दोनहि असलीं, ह्मणजे तो मूल्यास चढतो.

तसेंच कित्येकांस वाटतें कीं, जमीन लागवडीच्या उपयोगीं पडण्याकरितां तिची बांधबंदिस्ती करण्यांत, बरावण्यांत तिच्या धन्याचा ह्मणजे जमीनदाराचा खर्च झालेला असतो, ह्मणून लोक जमीनीला स्वामित्व देतात. कित्येक ठिकाणीं अशा रीतीनें जमीनदारास जमीन तयार करण्यास फार खर्च लागला आहे, तो स्वामित्वाच्या योगानें परत उभा होईल अशी जर त्यांना आशा नसेल, तर तसा खर्च करणार नाहींत. परंतु हा खर्च झालेला असतो ह्मणून जमीनीला स्वामित्व येतें असें नाहीं; कांकीं, जर त्याणें जमीन नीट करण्याकरितां यत्न करण्यांत पुष्कळ

खर्च केला; परंतु ती जमीन अधिक सफल झाली नाहीं, तर त्याच्या खर्च फार झाला ह्मणून स्वामित्व अधिक मिळणार नाहीं. पुनः कांहीं उत्पन्न होतें अशी जमीन जर तुजपाशीं आहे, व तशा जातीची फुकट मिळायाजोगी इतकी पुष्कळ जमीन नाहीं, तर तिजकरितां तुला कांहीं खर्च लागला नाहीं, तथापि तुला तिचें स्वामित्व येईल. कुरणाकरितां कोणा एकासहि कांहीं खर्च लागलेला नाहीं; परंतु तेथें आपोआप गवत रुजतें तें गुरांच्या उपयोगीं आहे ह्मणून शेतकरी त्याबद्दल स्वामित्व देतात.

समुद्रकिनाऱ्याजवळ कित्येक ठिकाणीं खडक आहेत ते ओहोटीच्या वेळीं उघडे असतात आणि भरतीच्या वेळीं बुडालेले असतात; अशा ठिकाणीं केल्प नामक वनस्पति आपोआप उगवते, ती कापून वाळवितात, आणि मग जाळून तिची राख करितात; ती राख साबु आणि कांच करण्यास फार उपयोगीं आहे. हे खडक यांच्या धन्यापासून केल्पचा व्यापार करणारे लोक स्वामित्वानें घेतात. यावरून पाहा, कीं स्वामित्वाच्या जमीनीच्या धान्य उत्पन्न करण्याचे शक्तीशीं, अथवा लागवड व्हावयाजोगी करण्यास जो खर्च लागतो त्याशीं, कांहीं संबंध नाहीं; कांकीं वर सांगीतलेले खडकांवर जरी धान्य उत्पन्न होत नाहीं, अ-

थवा ते कधींहि धान्य पिकायाजोगे करितां येणार नाहींत; तथापि त्यांचें स्वामित्व येतें.

जाग्यामध्यें कांहीं उत्पन्न होत नसतां, फक्त ती एकाद्या सोईवार ठिकाणीं असल्यामुळें तिजपासून स्वामित्व उत्पन्न होतें. एकादा कोळी समुद्रकांठच्या जाग्यास मोठ्या खुषीनें स्वामित्व देईल; तेथें कांहीं उत्पन्न न झालें तरी चिंता नाहीं, त्याची होडी ठेवायास, जाळें सुकण्याकरितां पसरायास आणि त्याचें लाहानसें झोंपडें व वखार बांधायास सोय असली म्हणजे झालें.

## प्रकरण ३

कित्येकांस असें वाटतें कीं, स्वामित्वाच्या योगानें धान्याची आणि इतर सामग्रीची किंमत चढते; परंतु ही त्यांची चूक आहे. जमीनीच्या स्वामित्वामुळें धान्याची किंमत चढत नाहीं; परंतु उलटें धान्य आणि त्या जमीनींत उत्पन्न होणारे दुसरे पदार्थ, यांच्या फार किमतीच्या योगानें स्वामित्व फार होतें. हें सहज ध्यानांत येईल कीं, स्वामित्वानें धान्याचा पुरावा कमी होत नाहीं; आणि धान्याची किंमत गिऱ्हाइकांच्या संख्येप्रमाणें बाजारांत जसा त्याचा पुरावा असतो, त्या प्रमाणें असते. मनांत आण कीं, सर्व जमीनदार

तिमे स्वामित्व कमी करायास कबूल झाले, तथापि जमीन आणि तींत उत्पन्न झालेलें धान्य, हीं आहेत तितकींच आहेत; तसेंच ज्या लोकांस धान्याची गरज आहे, तेहि आहेत तितकेच आहेत; ह्मणून शेतकऱ्यांस जितकी आतां धान्याची किंमत मिळते तितकी तेव्हांहि मिळेल. इतकेंच मात्र अंतर पडेल कीं, कांहींसे शेतकरी सधन होतील, आणि जमीनदारें गरीब होतील. मजूर आणि दुसरे लोक यांना कांहीं एक फायदा होणार नाहीं.

कित्येक ह्मणतात कीं, स्वामित्व कमी झाल्यानें शेतकरी मजूरांस कांहीं जास्त मजूरी देण्यास समर्थ होतील. परंतु जे असें ह्मणतात, ते देणें आणि बक्षीस या दोहोंची गडबड करून टाकितात. मजूरी हें, मनुष्याची कांहीं काळपर्यंत मेहेनत घेतली त्या बद्दलचें देणें होय; आणि जोंपर्यंत धान्याची किंमत सारिखीच आहे तोंपर्यंत, एका मजूराचें एका दिवसाचें काम, त्याच्या धन्याला, तो पूर्वीपेक्षां कांहीं सधन झाला ह्मणून त्यास किमतीचें होणार नाहीं. यांत कांहीं संशय नाहीं कीं, एकादा मनुष्य जितका अधिक श्रीमान् असेल तितका, तो, आपल्या शेजाऱ्याला, अथवा ज्याच्याशीं तो व्यवहार ठेवितो, त्या व्यापाऱ्याला, अथवा कोणा मजूराला, देऊं लागला असतां अधिक चांगलें

बक्षीस देण्यास शक्तिमान् होईल. परंतु तो सधन असल्यानें जोडा हा त्याला अधिक किमतीचा होणार नाहीं; कदाचित् त्याला योग्य वाटलें असतां, तो आपल्या कृपेच्या आणि दातत्वाच्या योगानें त्या चांभारास त्या जोड्याच्या किंमतीच्या दुप्पट बक्षीस देईल. याप्रमाणेंच, तो एकाद्या नांगऱ्यास अथवा दुसऱ्या कोणास बक्षीस देईल; परंतु त्याचें एक दिवसाचें काम त्याच्या श्रीमंतीमुळें त्याला अधिक किमतीचें होणार नाहीं.

ह्मणोन हें उघड आहे कीं, जमीनदारांस गरीब केले आणि शेतकऱ्यास सधन केले, तथापि मजूरी ह्मणून जें काय देतात त्यांत फेर पडावयाचा नाहीं. शेतकरी, जर देईल, तर त्याजवळ द्यावयास पुष्कळ पैसा होईल, आणि जमीनदारांजवळ कमी होईल; असें झालें तथापि हल्लीं जें दिलें जातें त्यापेक्षां तेव्हां अधिक दिलें जाईल, असें मानण्यास कांहीं कारण नाहीं.

अणखी जर सर्व स्वामित्व नाहींसें करून टाकिलें, आणि कांहीं दिल्यावांचून सर्व शेतकऱ्यांनी, जी जमीन ते वापरीत असतील, ती त्यांनी घ्यावी असें केलें, तर इतकेंच मात्र होईल कीं, जमीन एकापासून घेतली आणि दुसऱ्यास दिली. एकजण अगदीं नागवला जाईल आणि दुसऱ्या-

ची धन होईल; परंतु अशा चोरीनें धान्याचा पुरवा आणि त्याची किंमत हीं फिरणार नाहींत. अथवा जर स्वामित्व कमी करण्याकरितां असा एक कायदा केला कीं, जेणेंकरून जमीन हल्लीं ज्यांची आहे त्यांज कडेसच राहावी, परंतु दर बिघ्यास अमूक रुपये घेण्याविषयीं मात्र मोकळीक दिली, जास्त घेण्याविषयीं दिली नाहीं, तथापि इतकेंच मात्र होईल कीं, जमीनदार आपली जमीन स्वामित्वानें देणार नाहींत. आपल्या हातींच एक हस्तक ठेवून काम चालवितील.

अशीहि पुष्कळ देशांमध्यें चाल आहे; परंतु ज्याला बाळपणापासून या कामाचा अभ्यास आणि ज्यांची उपजीविका विशेषेंकरून शेतकीवरच असते, असे जे शेतकरी अथवा कुळंबी त्यांनां ती स्वामित्वानें (अथवा मक्त्यानें) दिली असतां, जशी तिची चांगली लागवड होते तशी तेव्हां होत नाहीं.

## प्रकरण. ४

स्वामित्व अगदीं नाहींसें केलें, तथापि धान्य समृद्ध अथवा स्वस्तें होत नाहीं, यावरून, जमीनदारास जें स्वामित्व मिळतें, त्याचें ओझें सर्व लोकांवर आहे असें मानणें ही मोठी चूक आहे तसेंच, जमीनदारांचा साभा-

ळ त्यांच्या कुळांच्या खर्चानें होतो, आणि त्याचें स्वामित्व, हें त्याजवर ओझें आहे, असें ह्मणणें हेंहि ठीक नाहीं. जसा एकादा मनुष्य दंड देतो ह्मणजे आपल्या जिनगींतून कांहीं भाग मोबदला घेतल्याशिवाय देतो, तसें ते स्वामित्व देतात असें नाहीं; परंतु तो जसा कुदळीकरितां अथवा शेरभर दाण्याकरितां अथवा दुसरा कोणताहि पदार्थ दुकानांतून घेतला असतां त्याकरितां देतो; अथवा जसें तो घोड्याचें अथवा गाडीचें भाडें देतो, त्यासारिखेंच ते स्वामित्व देतात. त्यांणी दुसऱ्याचा घोडा वापरायास घेतला असतां, अथवा दुसऱ्यापासून कांहीं वस्तू विकत घेतली असतां, त्याबद्दल जसें देतात, तसेंच जमीन त्यांची नसतां ते वापरतात ह्मणून त्याकरितां देतात; ह्मणजे आपल्या स्वतःच्या फायद्याकरितां तिची लागवड करण्याचा हक्क मिळविण्यासाठीं स्वामित्व देतात. जर जमीनदार चांगला मनुष्य असला, तर तो आपल्या प्राप्तीचा शाहाणपणानें योग्य खर्च करील, तेणेंकरून सर्व लोकांचें कल्याण होईल; परंतु त्याविषयीं त्याच्या कुळांस कांहीं एक ह्मणण्याविषयीं अधिकार नाहीं; कारण कीं, तो पैसा त्यांचा नाहीं, जमीनदाराचा आहे.

याप्रमाणेंच, जिला इनामजमीन असें ह्मणता-

त, ह्मणजे, कोणा एका पुरुषाची नव्हे; परंतु औषधालय, देवालय, शाळा, विद्यालय, अथवा दुसरा कोणताहि कारखाना, याला लावून दिलेली जी जमीन, तिजविषयींहि ह्मणतां येईल. अशा प्रकारच्या कोणत्याहि कारखान्याचा खर्च लोकांच्या डोकीवर नाहीं. अथवा जो शेतकरी ती जमीन स्वामित्वानें करितो त्याच्याहि डोकीवर नाहीं.

कित्येक देशांमध्यें वारंवार असें पाहाण्यांत येतें कीं, कोणी एकादा मनुष्य अंतकाळीं आपली सर्व जिंदगी आपल्या सोयऱ्या धायऱ्यांस द्यावयाची ती न देतां, त्यांतील कांहीं भाग औषधालयास, अथवा विद्यालयास, अथवा दुसऱ्या कोणत्याहि कारखान्यास, इनाम करून देतो; तो कारखाना जर चांगला उपयोगी असला, तर अशा करण्यापासून सर्व लोकांचा नफा आहे; कां कीं, तो असें न करिता तर ती जिंदगी एकाद्या पुरुषास मिळती, आणि मग त्याणें तिचा आपल्या इच्छे प्रमाणें पाहिजे तसा व्यय केला असता; ह्मणून अशानें लोकांचा कोणत्याहि गोष्टीनें तोटा होत नाहीं. याप्रमाणेंच, जो शेतकरी, त्या जमीनीचें स्वामित्व देतो, तो आपल्या पदरच्या खर्चानें तो कारखाना चालवितो असें नाहीं. कारण दुसऱ्या एकाद्या गृहस्थाचें शेत आणि हें इनामशेत, हीं दोनहि त्याला सारिखींच. तसेंच, कदाचित् त्या कारखान्या-

पासून त्याचा कांहीं एक लाभ होत नसला, तथापि त्याला कुरकुरण्यास कांहीं कारण नाहीं.

मनांत आण कीं, अशी इनामजमीन एका औषधालयास दिली आहे; आणि तें इतकें दूर आहे कीं, त्याच्या जमीनीच्या मक्तेदारास आजारी असतां तेथें जातां येत नाहीं; तथापि त्याला कुरकुरण्यास कांहीं कारण नाहीं; कांकीं, मीजें स्वामित्व देतो तें औषधालयाच्या उपयोगाकरितां देतो असें नाहीं. जमीनीच्या उपयोगाकरितां देतो. जर तें औषधालय त्याच्या शेजारींच असलें, आणि त्यापासून त्याला उपयोग होत असला, तर त्याचें दैव ह्मणावें. परंतु त्या जमीनीचें तो स्वामित्व देतो, ह्मणून त्याचा, त्याच्या शेजाऱ्यापेक्षां त्या औषधालयावर अधिक हक्क आहे असें नाहीं; कांकीं, त्या कारखान्याचा खर्च त्याच्या अंगावर यत्किंचित् देखील नाहीं. त्याप्रमाणेंच, ती जमीन एकाद्या देवस्थानास, अथवा विद्यालयास, अथवा शाळेस नेमून दिली असली तरीहि समजावें.

कांहीं एका जमीनीच्या उत्पन्नांतून जेव्हां अमुक एक भाग इनाम दिलेला असतो, तेव्हांहि याप्रमाणेंच प्रकार घडतो. मनांत आण कीं, कांहीं जिंदगी आहे, तिच्या उत्पन्नांतून दरसाल पांचशें, अथवा हजार रुपये, एका विद्यालयास, अ-

थवा दुसऱ्या एकाद्या कारखान्यास इनाम करून दिले आहेत, तर तितकी त्या जिंदगीची किंमत कमी येईल आणि जो कोणी ती जिंदगी खरेदी करितो, तो वास्तविक पाहातां सगळी खरेदी करीत नाहीं; निम्मा कांहीं भाग खरेदी करितो; आणि जरी त्याला त्या जिंदगीच्या उत्पन्नांतून त्या विद्यालयास ती रकम देणें जरूर आहे, (मग त्या विद्यालयापासून त्याला कांहीं लाभ होवो अथवा न होवो) तथापि त्याच्या खर्चाचें ओझें त्यावर आहे असें ह्मणवत नाहीं, कांकीं तो जो पैसा देतो तो त्याचा नाहीं.

ह्मणून, कोणत्याहि जातीच्या इनामापासून ज्यापेक्षां कोणाएकाचा तोटा होत नाहीं, त्यापेक्षां त्याचें कोणाएकावर अथवा सर्व लोकांवर ओझें आहे असें समजूं नये.

---

## पाठ ११

### मनुष्यांचे परस्पर व्यापारांत हरकती.

### प्रकरण १

मागील एका पाठांत, कायद्यानें मजूरीचा दर ठरविण्याविषयींचे सरकारचे सर्व प्रयत्न अगदीं निरुपयो-

गीं आणि नाशकारक आहेत असें दाखविलें. तसेंच, लोकांच्या पैशाच्या घडामोडींत, सरकाराने हरकत केली असतां, अथवा हात घातला असतां त्यापासून खरोखर चांगलें होण्यापेक्षां फार वाईट होईल; मग ती घडामोड कोणत्याहि जातीची असो, भाड्यानें देणें आणि करणें असो, अथवा विकणें आणि विकत घेणें असो.

परंतु कित्येक देशांत, यापेक्षांहि दुःखकारक आणि वारंवार अशा आणखी एकीकडून हरकती होतात; जे वास्तविक अधिकारी नसतात, व ज्यांस कांहीं अधिकारहि नसतो, असे पुरुष, लोकांस आपल्या हुकुमानें वागविण्याकरितां एकत्र जमतात, आणि त्यांनी अमूक मजूरी घ्यावी, व अमूक द्यावी, अथवा आपल्या जिंदगीची अमक्या रीतीनें व्यवस्था करावी, असें त्यांला सांगतात.

केव्हां केव्हां मजूर लोक, हंगामी, गवत अथवा धान्य कापायास मदत करून आपल्या पोटास मिळवावें, ह्मणून एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जातात; परंतु ते सराइच्या मजूरीचा दर उतरवून टाकितील, याकरितां तेथील लोक त्यांजवर तुटून पडून त्यांना हांकून लाविताल. तसेंच, केव्हां केव्हां कित्येकांस दाणा झोडण्याचीं, सूत काढण्याचीं, विणण्याचीं, वगैरे मोठीं उपयो-

गीं यंत्रें उपयोगांत आणण्याविषयीं मोठा प्रतिबंध होतो, कां- कीं, कित्येक लोक असें समजतात कीं, तीं यंत्रें चालू अस- ल्यानें मेहेनतीची किंमत उतरते; परंतु तूं पाहिलें आहेस कीं (पाठ ८ प्र० २।३) अशा विचारानें वागलें असतां का- ठ्यांनी मुळें वगैरे खणून काढून आपला निर्वाह करितात, व वल्कलें पांघरतात, असे जे रानटी लोक, त्यांसारखीच आ- पली अवस्था होईल.

शेताची दागदुजी नीट न केल्यामुळें, अथवा स्वामि- त्व न दिल्यामुळें शेतकऱ्याकडून मालकानें आपलें शेत काढिलें असतां, दुसऱ्या एकाद्या शेतकऱ्यास तें करण्यावि- षयीं मोठा प्रतिबंध असतो. त्या गरीब शेतकऱ्यास, तो धनी आपलें तें शेत, स्वामित्वानें देण्याविषयीं राजी अस- तो; परंतु ज्यांच्या त्या शेताशीं कांहीं एक संबंध नसतो, अ- से कित्येक लोक गुप्तरूपें कट करून त्याला भय दाख- वितात कीं, तूं तें शेत केलें असतां तुला खूब ठोक देऊं, अथवा ठार मारून टाकूं, तेव्हां अर्थात् त्या बिचाऱ्यास तें शेत करण्याविषयीं धीर होत नाहीं.

तसेंच कित्येक उद्योगी मुलांस, जेणेंकरून ते आ- पली उपजीविका चालवितील असा कांहीं व्यापार शिक- ण्याविषयीं मोठा प्रतिबंध होतो, कांकीं, व्यापाऱ्यांचे फेरी

वाले ह्मणून जे चाकर असतात, ते बहुधा त्यांना पाहिजे तितके व्यापार शिकणारे मुलगे ठेवूं देत नाहींत; त्यांचा असा बेत असतो कीं, असें केल्यानें आपल्याच हातीं व्यापार राहून आपल्याला पुष्कळ पैका मिळेल. याकरितां, ते एकोपा करितात आणि जर एकाद्या व्यापाऱ्यानें त्यांचें ह्मणणें ऐकिलें नाहीं, तर त्याचें ते स्वतः कांम करीत नाहींत इतकेंच नाहीं; परंतु दुसऱ्या कोणासहि त्याचें कांम करूं देत नाहींत. कित्येक ठिकाणीं, एकाद्या कारखान्यांत कांहीं नियम चालू करायाचे असले, ह्मणजे तेथील मजूरांनीं एकोपा करावा, हीं अगदीं साधारण गोष्ट आहे. त्या नियमामध्यें, त्यांनीं ठरविलेल्या मजूरीच्या दरापेक्षां कमी दरानें कांम करूं नये, हा मुख्य नियम होय. आणि अर्थात् त्या ठरविलेल्या दराप्रमाणें कांम न मिळालें, तर दुसरे मजूर आपल्याला मोठ्या क्रूरपणानें पीडा करितील ह्मणून कमी दरानें कांम न करितां त्यानें रिकामें बसून उपाशीं मरावें.

विलायतेंतील बहुतेक लोक आपल्याला स्वतंत्र असें समजून आपल्या स्वतंत्रतेच्या गर्वें वाहातात; आणि दास्यत्व कबूल करण्यापेक्षां लढायास आणि मरायास सिद्ध आहों असें ह्मणतात. रशिआतील, शेतांत रव-

पणारे दास, भक्तदास, आणि तुर्कस्थानांतील अथवा इराणांतील स्वेच्छाचारी सरकारच्या अधिकाराखालची प्रजा, यांजकडे पाहून त्यांना कळवळा आणि तिरस्कार उत्पन्न होतो. असें असतां त्यांतून पुष्कळांस, साऱ्या पृथ्वीमध्यें जें वाईट सरकार, त्यापेक्षांहि अधिक क्रूर आणि स्वेच्छाचारी, अशा जुलूमकारांच्या अधिकाराखालीं राहाणें आवडतें. आपलें सामर्थ्य, कौशल्य, अथवा काळ, हीं कशीं योजावीं, याविषयींहि मोकळीक देत नाहींत. असे जे हे जुलूमकार, त्यांच्या ते हुकूमांत राहतात. ते त्यांना सांगतात कीं, त्यांनीं अमक्याच धन्याचें काम करावें, अमूकच काम करावें, अमकींच यंत्रें योजावीं, आणि अमूकच मजूरी मिळवावी. केव्हां केव्हां हे जुलूमकार त्यांना अमूक रकमेपेक्षां अधिक मिळवूं नये, असा हुकूम करितात; केव्हां अमूक रकमेपेक्षां कमी मिळवूं नये असें सांगतात; व केव्हां केव्हां कांहीं काम करूं नये, आणि आपल्या बायकापोरांस उपास काढीत बसवावें अशी आज्ञा करितात. त्या जुलूमकारांचे खर्च चालविण्याकरितां त्यांना मोठमोठे कर द्यावे लागतात, आणि त्यांनीं जर ऐकिलें नाहीं, तर त्यांच्या न्याय केल्याशिवाय त्यांना पुष्कळ मारतात, अथवा हातपाय मोडून टाकितात, अथवा डोळे फोडून टाकिता-

त,अथवा गरहि मारून टाकितात.

## प्रकरण.२

मागील एका पाठांत (पाठ ८ प्रक.१) असें सांगीतलें आहे कीं, कोणत्याहि देशाचें कल्याण व त्यांत विशेषेंकरून मेहेनती लोकांचें कल्याण, बहुत करून भांडवलाच्या वृद्धीवर असतें; आणि जेव्हां भांडवलदार, लांकाशैर प्रांतांतील कापसाच्या कारखान्याप्रमाणें मोठमोठे कारखाने चालावयास शक्तिमान् असतात, तेव्हां त्या प्रत्येक कारखान्यामध्यें शेंकडो गरीब कुटुंबांस चाकरी मिळते.

या प्रत्येक कारखानदारास, आपल्या कामकऱ्यांचें जसें काम असेल व त्याच्या मालाची जशी किमत येत असेल, त्याप्रमाणें मोठमोठे पगार द्यावे लागतात. कांकीं, जर त्यानें कमी पगार दिला, तर ते कामकरी त्याला सोडून देऊन दुसऱ्या कोठें अधिक पगारावर जातील. बरें, जर त्यानें त्यांस जास्त पगार दिला, तर त्याला नफा व्हावयाचा तो उलटा तोटा होईल; तसेंच त्यांनी केलेलें काम किती आहे, अथवा कसें आहे हें न पाहतां त्यानें जर सर्वांस सारिखाच पगार दिला, तर

बहुतकरून असें होईल कीं, कित्येकांस तो फार ज्यास्त देत असेल, आणि कित्येकांस फार थोडा देत असेल. जे कामकरी वाईट असतील त्यांनां पुष्कळ आणि जे चांगले असतील त्यांनां थोडा, असें होईल. याशिवाय, आणखी जेव्हां कामकऱ्यांस त्यांच्या गुणाप्रमाणे पगार मिळत नाहीं तेव्हां तेथें चांगले असे थोडेच असतात. कांकीं मोठ्या मेहेनतीनें काम केलें अथवा चांगलें केलें, तरी त्यापासून आपल्यास कांहीं फायदा नाहीं; असें ते समजतात, आणि मग आळशी आणि निश्चिंत होतात.

आतां हें उघड आहे कीं, सर्व मजूर अथवा कामकरी लोकांमध्यें उत्कृष्ट ह्मटले ह्मणजे सर्वदां थोडकेच असतात; मग साधारण सर्व कितीहि चांगले असले तथापि त्यांमध्यें अधिक हुशार अथवा अधिक शक्तिमान् अथवा अधिक मेहनती ह्मटले ह्मणजे अर्धी थोडे निघतात. आणि बहुधा असें आढळतें कीं, त्यांतून जे कित्येक मध्यम प्रतीचे आणि वाईट स्वभावाचे असतात, ते साधारण मजूरीपेक्षां अधिक मिळविणारांचा हेवा करितात, व इतरांसहि त्यांचा हेवा करण्याविषयीं चेतवितात. साधारण मजूर ह्मटले ह्मणजे

अगोदरच हलक्या स्वभावाचे व मूर्ख असतात, त्यांस त्यांना हेहेवा करणारे असें समजवितात कीं, सर्वांस सारखा पगार दिला आणि जितकें स्वतः त्यांना करावेसें वाटतें त्यापेक्षां अधिक काम कोणीहि करूं नये असें केलें, तर फार चांगलें होईल. ते असें ह्मणतात कीं, जर आपण थोडे असतों, अथवा यांत्रिक शक्ति कमी योजिली असती तर आपल्याला अधिक पगार मिळता. तसेंच ते त्यांच्या मनांत असें भरवून देतात कीं, आपला धनी ह्मणेल तितका अधिक पगार देण्यास शक्तिमान् होईल, फक्त त्या प्रमाणानें आपल्या जिनसाची किंमत चढविली ह्मणजे झालें; परंतु ते असें समजत नाहींत कीं, मालाची किंमत चढविली असतां विकरी कमी होईल, किंवा कदाचित् अगदीं होणारहि नाहीं.

याप्रमाणें, ते आपल्या सोबतीच्या कामकऱ्यांतून पुष्कळांस, कट करावा आपणास त्यांचे नाईक ह्मणजे अधिकारी नेमावे असें समजवितात. या नाइकांचें मुख्य काम ह्मटलें ह्मणजे त्यांनीं त्या कटाच्या बंदोबस्त राखण्याकरितां कायदे करावे, आणि ते जो मोडील त्यास शिक्षा करावी. सर्व प्रकारच्या कटांमध्यें हे खालीं लिहिलेले चार मुख्य कायदे असतात. पहिला, कटांतील सर्व जणांनी नाइकांची आज्ञा मान्य करावी. दुसरा, कटाम-

ध्यें जो नसेल त्याजबरोबर करांतील कोणी एकानेंहि काम करूं नये, आणि जो धनी त्या कराचें ऐकत नाहीं त्याचेंहि काम करूं नये: तिसरा, त्यांनीं ठरविलेल्या मजूरीपेक्षां कमी मजूरी घेऊन कोणी काम करूं नये: आणि चवथा, त्या कराच्या खर्च चालविण्याकरितां प्रत्येक जणानें दर आठवड्यास अमूक एक रकम देत असावी. या करांतून कांहीं भाग ते नाईक आपणाकरितां घेतात. बहुतकरून या कायद्यांस आणखीहि कांहीं कायदे जोडलेले असतात. कोणाचें अर्धें अथवा थोडेसें काम करूं नये; ठरविलेल्या रकमेपेक्षां कोणी ज्यास्त मिळवूं नये, आठवड्यामध्यें अथवा दररोज ठरविलेल्या अमूक कामापेक्षां ज्यास्त काम करूं नये. तसेंच धन्यानें कराच्या अनुमोदनाशिवाय कोणालाहि कामावर ठेवूं नये, अथवा कामावरून दूर करूं नये; आणि आपल्या कारखान्यांत कांहीं करणें झालें, अथवा एकादें यंत्र आणणें झालें, तर कराला पसंत पडल्याशिवाय आणूं नये. या नाइकांस एकदां अशी सत्ता मिळाल्यावर, ते भय दर्शवून, आणि जे त्यांच्या विरुद्ध असतील, अथवा जे त्यांच्या करांत येत नसतील, त्यांच्या जिंदगीवर व जिवांवर बलात्कार करून आपली सत्ता तशीच कायम राखितात जो कामकरी त्यांची अवज्ञा करितो, त्याला मार देतात; डोकें फोडून आंधळा करि-

तात, अथवा ठार मारितात. आणि जो धनी त्यांचें ऐकत नाहीं त्याच्याशीं बखेडा करितात, म्हणजे ते त्याचें काम करीत नाहींत, अथवा कोणास करूंहि देत नाहींत, म्हणजे त्याला सहजच शिक्षा होती.

जर त्यानीं ज्यास्त मजूरी मागीतली, आणि त्यानें देण्याचें नाकबूल केलें, अथवा त्यांच्या हुकुमाशिवाय एकाद्या कामकऱ्यास त्याच्या गैरवर्तणुकेवरून काढिलें, अथवा ते मना करीत असतील तें यंत्र कारखान्यांत ठेविलें; सारांश त्याला, त्या नाइकांनीं त्यांस योग्य दिसेल ती आज्ञा केली, आणि त्यानें ती ऐकिली नाहीं, तर ते लागलाच बखेडा करायास सांगतात; म्हणजे सर्व मजूरांस त्याचें काम सोडून द्यावयास सांगतात. आणि जो कोणी त्याचें काम करण्याविषयीं उद्योग करील, त्याला हाकून लावायास, त्याजवर तुटून पडायास व केव्हां गर मारण्यासहि आज्ञा करितात.

जेव्हां हा बखेडा लाहानसाच असतो म्हणजे एक दोघां धन्याच्याच मजूरास काम सोडायास सांगीतलें असेल, तेव्हां त्या कटांतील जे दुसरे मजूर कामावर असतात, त्यांच्या मजूरींतून कांहीं अंश त्यांच्या निर्वाहाकरितां मिळतो, व हें एक त्याजपासून कर घेण्याचें कारण होय; प-

रंतु एकाद्यासमयीं जेव्हां पुष्कळ धन्याच्या मजूरांस आपलीं कामें सोडायास सांगतात, तेव्हां नाइकांनी याच कारणाकरितां जी ऐवज (समुदित द्रव्य) जमविलेला असतो त्यांतून त्यांस सरासरी गरीबीनें गुजराणी होण्यापुरतें मिळतें; परंतु हा बखेडा जेव्हां पुष्कळ दिवस पर्यंत चालतो तेव्हां तेंहि कमी होतां होतां शेवटीं हानरुण पांघरुण, घरांतील सामन वगैरे विकतात, आणि निदानपक्षीं घरंहि विकून प्राण वांचण्यापुरतें अन्न खाऊन एका लाहानशा कोठडींत तीन चार कुटुंबें निजतात.

अशा समयीं कारखाने बंद असतात असें नाहीं, परंतु त्यांच्या जुलूमगारांहीं भाड्यानें केलेले मारेकरी आपणास मार देतील, अथवा कदाचित् ठारहि मारतील असा त्यांनां धाक असतो, ह्मणून कारखान्यांत जाऊन काम करण्यास कोणाचाहि धीर होत नाहीं. याप्रमाणें अमेरिकेंतील गरीब काफ्री दासांपेक्षांहि त्यांची स्थिति वाईट होती; कारण कीं, त्या दासांचे, पाषाण हृदयी धनी, आपल्या हिताकरितां त्यांची प्रकृति नीट राहून त्यांच्या अंगीं शक्ति राहाण्याकरितां, अन्नादि आवश्यक पदार्थ तरी त्यांनां देतात.

शेवटीं जेव्हां फंडांतील ऐवज आपल्यास फार दि-

वस पुरणार नाहीं असें होतें, आणि धनी तर त्यांचें ह्मणणें ऐकत नाहींत तेव्हां ते नाईक आपल्या चाकरांस (करांतील मजूरांस) आपलें मागणें सोडून देऊन कामावर आध्यास मोकळीक देतात. आणि त्याप्रमाणें खराब अन्न, एका ठिकाणीं राहाणें, व नाना प्रकारचीं दुःखें आणि विपत्ति, इत्यादिकांपासून होणाऱ्या रोगांतून जे निभावतात ते कामावर जातात.

---

## प्रकरण ३

### जो बखेडा चालत नाहीं त्याची ही अशी कथा.

परंतु जो चालतो तो तर फारच नाशकारक आहे; कारण कीं, तो नाश फार दिवस पर्यंत पुरवतो. मूर्ख आणि जुलुमी असे जे हे नाईक ते, आपली सत्ता आपल्या बरोबरीच्या मजूरांवर आणि धन्यावरहि चालू लागली ह्मणजे, तिच्या योगानें दोघांचाहि नाश करून टाकितात. ते मजूरांतून कोणाला चांगल्या वर्तणुकेवरून अधिक देऊं देत नाहींत, अथवा वाईट वर्तणुकेवरून कादू देत नाहींत; तेणेंकरून सर्वांची एकसारिखी दशा होऊन जाती.

याप्रमाणे मजूरांमध्यें काम करण्याची इच्छा अगदीं नाहींशी करून टाकून त्यांची हुशारी, उद्योग, आणि अब्रू, हीं बिघडवितात. आणि याप्रमाणें मजूरांस बिघडवून धन्याला ज्यास्त मजुरी देण्याविषयीं जरूर पाडतात, व त्यांच्या कामाच्या व्यवस्थेंत कांहीं ढवळाढवळ करितात, तेणेंकरून त्यांच्या व्यापारांस नफा अगदीं होत नाहीं. याप्रमाणें, कित्येक धन्यांचा अगदीं नाश झाला आहे, व कित्येकानीं आपले सर्व भांडवलाची रोकड करून तो धंदा सोडून दिला आहे, अथवा अमेरिकेंत गेले आहेत, अथवा जेथें वर सांगीतल्याप्रमाणें दुष्टपणा व मूर्खपणा चालत नाहीं तेथें जाऊन राहिले आहेत.

परंतु मजूर तसेच राहिले, त्यांना कोठें काम मिळत नाहीं, म्हणून त्यांतून कित्येक जण नवा धंदा शिकूं लागतात; परंतु या रीतीनें निर्वाह करण्याविषयीं जे यत्न करितात, त्यांना दुसऱ्या व्यापारसंबंधीं जमावापासून मोठा प्रतिबंध होतो; दुसरे मजूर एकमत करून नव्या मजूरांस आपल्या कारखान्यांत येऊं देत नाहींत, म्हणून कित्येक आपल्या मित्रांच्या धर्मावर राहातात, अथवा कित्येक भीक मागतात.

याविषयींचीं कांहीं उदाहरणें इंग्लंडांत सांपडतील, व ऐर्लंडांत तर पुष्कळच सांपडतील. ऐर्लंडांमध्यें, जो

व्यापार चालवायास एकाच धन्याच्या हातीं पुष्कळ भांडवल आणि पुष्कळ मजूर असले पाहिजेत, त्या व्यापारांतील मजूर एकमत करून कट करितात. आणि पुन: असले निरनिराळे कट मिळून एक जमाव करितात. या कटांचें आणि जमावांचें इतकें चालतें कीं, जो कोणी यांच्या आज्ञा मोडितो त्याला आपल्या जीवाच्या एक दिवसाचाहि भरंवसा नाहीं, आणि ही अशी अवस्था चाळीस किंवा पन्नास वर्षें पर्यंत असल्यानें त्यांतून कित्येक व्यापार अगदीं बुडून गेले आहेत.

डब्लिन् हें पूर्वीं गलबतें बांधण्याची एक मुख्य जागा होती; परंतु आतां तेथें गलबतें बांधीत नाहींत, आणि एकादें नीटहि क्वचितच करीत असतील. कारण कीं, सुतारांच्या कटामुळे ज्या गलबतें बांधणारांच्या नाश झाला नाहीं, ते लिवरपूल आणि लंडन एथें जाऊन राहिले. तसेंच पूर्वीं तेथें लांकडी सामानाचा मोठा कारखाना असे; परंतु आतां तेथील लोकांस जें सामान लागतें तें बहुतकरून इंग्लंडांतून नेतात. ऐर्लंडाच्या मध्यभागाचा सर्व माल स्वल्पामध्यें डब्लिन् एथें आणतां यावा, ह्मणून मोठा खर्च करून एक कालवा बांधिला. परंतु तेथील नावाड्यांनीं कट करून आपल्या मजूरीचा दर ठर-

चून टाकिला आहे, आणि कोणी आळशी असला, दारु-बाज असला, अथवा चोर असला, तरी हि त्याला कामावरून काढूं देत नाहींत; ह्मणून अर्थात त्या कालव्याचा थोडकेच लोक उपयोग करितात. आणि जो माल, नावाड्यांच्या दुर्लक्ष्यानें खराब व्हावयाजोगा आहे अथवा चोरीस जावयाजोगा आहे, तो या मार्गानें कोणी हि पाठवीत नाहीं. इंग्लंडामध्यें जे शेतकी करीत नाहींत, त्यानां कारखान्यांत अथवा व्यापारांत चाकरी मिळते. ऐर्लंडांतील बहुत करून सर्व कारखाने आणि व्यापार करांमुळें बंद आहेत; ह्मणून ज्याला त्याला शेतकीवरच पोट भरायाचें पडतें. आणि तेथें सर्वांस पुरायाजोगी पुष्कळ जमीन नसल्यामुळें नेहेमी जमीन मिळविण्याविषयीं आणि ती राखण्याविषयीं लंटेबखेडे होऊन खून होतात.

याप्रमाणें या करांच्या परिणामानें, एकादा देश अगदीं लवकर गरीब होऊन दुःखकारक अवस्थेस येऊन पोहोंचेल; कारण कीं, करांच्या योगानें, जे त्यामध्यें सामील असतात त्यांचाच मात्र नाश होतो असें नाहीं, इतर लोकांचा हि मोठा खराबा होतो; भांडवल लावून मजुरांस कामावर ठेवतां येत नाहीं, आणि मग अर्थात त्यांना व त्यांच्या कुटुंबास खावयास हि मिळत नाहीं.

तात्पर्य, जेथें राज्याचा बंदोबस्त नीट नसतो अशा देशांमध्येंहि मातबरापासून गरीबांस जीं दुःखें भोगावीं लागलीं आहेत, तीं, ते परस्परांपासून जीं दुःखें भोगितात त्यासारिखीं भयंकर नाहींत. कांकीं जरी देशामध्यें तेथील राजे आपल्या आत्मस्वार्थीपणानें, क्रूरपणानें, आणि फार करून मूर्खपणानें जरी पुष्कळ नाश करितात, तथापि मजूर लोक ज्या जुलूमगारानां आपले अधिकारी करितात, ते, त्यांजपेक्षांहि अधिक आत्मस्वार्थी, अधिक क्रूर आणि अधिक मूर्ख असतात, ह्मणून अधिक नाशकारक आहेत. ही गोष्ट मात्र कांहींशी आनंदकारक आहे कीं, लोक ज्या दुःखांस पात्र आहेत तीं दूर करण्याचे उपाय त्यांच्याच स्वाधीन आहेत. जेव्हां त्यांनां आपला वास्तविक स्वार्थ समजूं लागेल, तेव्हां ते या सर्व गैरवाजवी कटांस अडथळा करण्यास राजी होतील. आणि कायद्याला हरकत करण्या करितां अथवा त्यांत कांहीं फेरफार करण्या करितां नाहीं; परंतु तो कायदा चालविण्या करितां आणि जो कोणी दुसऱ्याच्या हक्कावर बलात्कार करूं पाहील, त्याला अडथळा करण्या करितां ते निश्चयपूर्वक एकमतानें वागण्याविषयी यत्न करितील. आपल्याला व आपले देशाला वास्तविक स्वतंत्रता राखण्या करितां त्यांच्या-

नें होईल तितकें ते करितील; ह्मणजे प्रत्येक मनुष्यास आपल्या शेजाऱ्याचें कांहीं वाईट न करितां, आपल्या इच्छेस येईल, त्याप्रमाणें आपल्या जिंदगीची, आपल्या वेळाची, आपल्या शक्तीची आणि आपल्या कसबाची व्यवस्था करण्यास मोकळीक असण्याकरितां त्यांच्यानें जितकें करवेल तितकें ते करितील.

समाप्त.